







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

TOM & BAY/KOEL/M-4/64

# शेतकऱ्यांना मोठा अभिमान वाटणारीं एंजिनें !





## किर्लोस्कर

## डिझेल एंजिनें

### शेतीसाठीं उत्कृष्ट

**एव्ही १ ५हॉर्स पॉवर डिझेल एंजिनें**

- वाजवी किंमत
- विश्वसनीय
- चालण्याच्या व सुस्थितींत ठेवण्याच्या दृष्टीनें किफायतशीर
- चालवायला सोपीं
- बसवायला सुलभ
- बिनतकार वर्षानुवर्षे काम देणारीं



**किर्लोस्कर ऑइल एंजिन्स लिमिटेड, पुणें - ३**


अनुक्रमणिका


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# दीपावली

साहित्य * कला * संस्कृति



ऑक्टोबर ६५
वर्ष २१ वें
मूल्य १ रु.

## श्रेयनामावली—

- **खास लेख** :–काश्मीर–एक दृष्टिकोन [**ले. क. रा. ह. लिमये**] ● एक "फणस"–डॉ. ग. ना. लवंदे (**डॉ. म. मा. अळतेकर**) ● सौंदर्यशालिनी क्लिओपात्रा आणि गुणखनी कान्होपात्रा–**एक साम्यविरोध** (डॉ. **प्र. न. जोशी**)
- **चालू कादंबरी**:–**देवाला डोळे असतात.** (अनुवादक–**प्र. श्री. नेरुरकर**)
- **चार कथा**:—शोध लागला–पण फार उशिरां (**शोध–प्रा. उत्तम शिरवळकर**) ● त्यांनीं नवऱ्याला खूप रजा घ्यायला लावली, जणुं त्यांना (**चाहूल–आनंद रेगे**) ● तिनें सुंदर फुलांचा गुच्छ माझ्या हातीं दिला. तीही सुंदर होती–धुकें विरले नव्हतें. पण त्यांतून सुंदरता स्त्रवत होती. (**धुकें–ना. व्यं. देशपांडे**) ● अपघाताची वार्ता ऐकली आणि आई आनंदली (**माणूस मेलाय् मोटारखाली–अनन्त तडवळकर**)

—— याशिवाय ——

सन्मानपुष्पें, दीपमाला, ऐसी अक्षरें, वात्रटिका, व्यंगचित्रें


**दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

टे. नं. ७७७६५
Gram : Dalalart

● संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं. प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.

Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57
DIPAVALI : Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay-4.


भारत सरकारचें १९६५ चें श्रेष्ठता प्रमाणपत्र मिळविणारे एकमेव मराठी मासिक




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट


अनुक्रमणिका

# दीपावली

## दलाल आर्ट स्टुडिओ

४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४,
टेलिफोन : ७७७६५
★ तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टु डओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जवाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जवाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.

# येई रुद्रा !

**डुमडुमत डमरु ये। खण्खणत शूल ये. शंख फुंकीत ये। येई रुद्रा.**

(भा. रा. तांबे)

ये रुद्रा ये ! ये कालिके ये ! ये महिषासुर मर्दिनी ये ! ये दुर्गे ये ! कुरुक्षेत्रावर विराट रूप दाखवून युद्धनीति शिकविणाऱ्या श्रीकृष्णा ये. सुरारि रावणाचा अहंकार दमन करणाऱ्या रामचंद्रा या, "कुठें आहे तुझा तो परमेश्वर ? या खांबांत आहे ?" म्हणून अहंकार मदानें अंध होऊन विचारणाऱ्या हिरण्यकश्यपूच्या 'नारसिंहा' ये. 'बळी'च्या वामना ये ! या ! साऱ्या देवानो, या ! तुमच्या साऱ्या शस्त्रांसह या. अस्त्रांसह या. आशिर्वादांसह या. प्रेरणांसह प्रगट व्हा. तुमच्या 'गीतेचा' मंत्र गात या. 'तस्माद् युद्धस्व भारत' असा आदेश देत या. अर्जुनाचे भ्रम नाहींसे करण्यासाठीं या. अर्जुनाच्या ध्वजाच्या रक्षणासाठीं महाबलि हनुमानजी तुम्हींही या. अर्जुनाच्या रथाचें सुयोग्य सारथ्य करण्यासाठीं योगेश्वर कृष्णजी या. आज पुन्हां एकदां "महाभारत" घडते आहे. त्याच्या रक्षणासाठीं हे देवतांनो, साऱ्या सुरशक्ति आमच्या पाठीशीं उभ्या राहूं देत ! हे महारुद्रा, डुमडुमत डमरु ये. . .

हा लढा तुम्हांला नवीन नाहीं. रुद्रशक्तींनो, तुम्हीं जेव्हां प्रकटलांत तेव्हां हाच लढा चालूं नव्हता कां ? काळ बदलला असेल, रूप बदललें असेल, नांव बदलले असेल, साधनेंही बदललीं असतील. पण प्रवृत्ती तीच आहे. अहंकार तोच आहे. विनाशाचा कैफ तोच आहे. आज पुन्हां असुरांनीं सुरांवर वार केला आहे. ऋषी मुनींच्या तपानें पावन झालेल्या, गंगा, यमुना, गोदेनें पुनीत केलेल्या, अशोक, विक्रमादित्य, चंद्रगुप्तानें भूषविलेल्या ह्या देव भूमींत असुरांनीं पुन्हां एकदां सारीं जीवनमूल्यें पायाखालीं तुडवीत थैमान आरंभले आहे. पुन्हां एकदां धर्म संकटांत आहे. नीतीच्या नरड्याला नख लागले आहे. सारें जीवन मुळीं मृत्यूच्या छायेंत वावरतें आहे. आणि म्हणूनच 'यदा यदाहि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत' हें आश्वासन पूर्ण करण्यासाठीं हे रुद्रा, ये ! डुमडुमत डमरु ये.

समोर उभे आहेत ना ते दुर्योधन, दुःशासन, शकुनी, कर्ण, रावण, महिषासुर नरकासुर आहेत. त्यांच्या पाठीशीं उभे आहेत ते भीष्म, द्रोण, कृप आहेत. ते सत्प्रवृत्त आहेत. हें युद्ध होऊं नये. वंशविच्छेद होऊं नये. आपसांत लढून शत्रूला हे घर मोकळे करून देऊं नये असें त्यांनाही वाटते. ते ज्ञानी आहेत. त्यांची पांडवांच्या धर्मनिष्ठेबद्दल, प्रामाणिकपणाबद्दल खात्री पटलेली आहे. पण तीं माणसें वचनांत गुंतलीं आहेत. तीं लाचार झालीं आहेत. पण तरीही हें युद्ध लढलेंच पाहिजे. विजय मिळेपर्यंत लढलेच पाहिजे. कारण जगांत नीति, धर्म, श्रद्धा, निष्ठा, [illegible] आणि सतीत्व जगलेंच पाहिजे. अ[illegible]क्तांचा क्षय झालाच पाहिजे. अनीति पराभूत झालीच पाहिजे असुरशक्तांचें निर्दाळण झालेंच पाहिजे. देवांचे अधिराज्य टिकलेंच पाहिजे. कारण 'विनाश' हा असुरांचा परवलीचा शब्द आहे. आणि संरक्षण, संवर्धन ही देवराज्याची नीति आहे, युगें युगें चालत आलेली ! त्या नीतीचा विजयदिन जवळ येत आहे. म्हणून अंतिम प्रलयासाठीं हे रुद्रा, डुमडुमत डमरु ये !!

हे रुद्रा, आज सुषुप्ति नको, जागृति हवी. शैथिल्य नको, चैतन्य हवे. तृप्ति नको, असमाधान हवे. मरगळ नको, आत्मसाक्षात्कार हवा. दुबळी भाषा नको, सिंहाची डरकाळी हवी. अंगाई गीतें नकोत, रण गीतें हवींत. भाव कविता नकोत, शाहिरी कविता हवी. सतार नको, रुद्र वीणा हवी. बांसरी नको, शंख हवा. तबला नको, नगारे हवेत, डफ हवेत, तुताऱ्या हव्यात, रणभेरी हव्यात. टाळ नकोत, रणशिंगें गरजूं देत. कारण आज एक मूलभूत स्वरूपाचा संगर सुरूं झाला आहे. इथें शस्त्रें लढत नाहींत तर दोन प्रवृत्ती व प्रकृति एकमेकांसमोर उभ्या आहेत. शस्त्रें सरतील, पण तत्वें मरणार नाहींत. मान तुटेल, पण मन मरणार नाहीं. कारण मुरारबाजीची प्रेरणा त्याच्या पाठीशीं उभी राहिलेली असेल. हे महारुद्रा, म्हणूनच ये. डुमडुमत डमरु ये. खण्खणत शूल ये. शंख फुंकीत ये. —कारण तूंच ह्या समराचा सेनापति आहेस. तुझ्या 'तांडवा' लाच तर हें 'आव्हान' आहे.

–संपादक







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

## सारा अंक वाचनीय

स. न. वि. वि.

दीपावलीचा ऑगस्ट महिन्याचा "ट्रेस्ट विशेषांक" वाचण्यास उशीरा मा पडला. अंक पूर्ण वाचल्याशिवाय खाली ठेवला गेला नाहीं, ह्याहून वेगळे कोणते सर्टिफिकेट द्यावे ? गोपालकृष्ण भोवे ह्यांनीं जिव्हाळयाच्या भाषेंत लिहिलेला "पंगूम् लंघयते गिरिम्" हा लाला उर्फ डॉ. दत्तात्रय वामन तेलंग ह्यांचा उत्कृष्ट परिचय करून देतो. डॉ. सौ. मंजुळा घोष यांनीं आपल्या बंधुराजाच्या एव्हरेस्ट मोहीमेच्या तयारीच्या संदर्भात आपल्या आईस ओथंबून लिहिलेल्या पत्रां-तून, गिर्यारोहणास आवश्यक असलेल्या साधनसामुग्रीची माहिती, तर ज्ञानांत छानच भर घालून जाते. निरनिराळया विषयावर प्रभाकर अत्रे यांनीं डॉ. तेलंगची घेतलेली मुलाखत तर ह्या सर्वांवर ताण करून जाते. या व्यतिरिक्त वाचनीय अशा दोन कथांचा उल्लेख करणें आवश्यक आहे." "भागीदार" या गो. गो. दातेंच्या कथेची नायिका विनोदिनी स्वतः बी. ए. असून, नवऱ्याच्या दुकानदारीसारख्या खाजगी व्यवसायावद्दल देखील जो आदर, अभिमान दाखवते, तो आजच्या सुशिक्षित व डॉ., वकीलच नवरा हवा, म्हणणाऱ्या तरुणींनी विशेषकरून लक्षांत घ्यावा. "अपुरा ताज" या लीला श्रीवास्तव ह्यांच्या कथेंतील हृदय भंगलेली नायिका नीता हिच्याबद्दल अनुकंपा वाटते. एकेकाळचे आमचे प्रा. असलेले नाटककार श्री. वसंत कानेटकर ह्यांचा "आम्ही असें लिहितो" हा लेख केव्हां वाचू अशी चुटपूट लागली आहे.

**नासिक** **देविदास रघुनाथ परांजपे.**

## सर्वांग सुंदर

स. न. वि वि

ऑगस्ट महिन्याचा क्रांती गौरव विशेषांक वाचला. सर्वांग सुंदर असा हा अंक काढल्याबद्दल मनःपूर्वक अभिनंदन.

१९६५ च्या मे महिन्यामध्यें भारतीय गिर्यारोहक पथकानें जे विक्रमी यश संपादन केले त्याबद्दलचा यथोचीत गौरव आपण विशेषांकाद्वारें साधला हें औचित्यपूर्णच झालें.

डॉ. दत्तात्रय वामन उर्फ लाला तेलंग ह्या महाराष्ट्राच्या लालावर गुण-गौरव-सुमनें उधळून आपण त्यांच्या शौर्यावर मानाचें पान आदान केल्याबद्दल देखील शतशः धन्यवाद.

निरनिराळया विक्रमी धाडसांमध्यें परप्रांतियांचेच नांव ऐकून एक प्रकारचा न्यूनगंड निर्माण झाला होता तो डॉ. लाला तेलंगांच्या "हम भी कुछ कम नहीं" अशा अतुलनीय धाडसामुळें नष्ट झाला.

सह्याद्रीचा हा छावा पुन्हां एकदां हिमालयांच्या कुशींत शिरून जगांतील अत्युच्च शिखर पादाक्रांत करील असा विश्वास व्यक्त करतों.

त्याचप्रमाणें **"आज गात ही जयगाथा"** सारखें अद्वितीय संपादकीय मनोगत प्रकट केल्याबद्दल आपलें आभार कोणत्या शब्दांत मानावेत हेंच समजत नाहीं. कारण असल्या असामान्य लिखाणाचे रसग्रहण करण्यास देखील असामान्यच शब्द हवेत. मी फक्त एव्हढेच म्हणेन कीं,

झाले बहू . . . होतील बहू . . . परी ह्यासम हा. . . . पुन्हां एकदां धन्यवाद.

**नासिक** **लीलाधर पाटील.**

## आमच्याच भावना

स. न. वि. वि.

आपला सप्टेंबरचा अंक वाचला. पाकिस्तानने काश्मीरचें निमित्त करून भारतावर केलेल्या आक्रमणाचे निमित्तानें आपण लिहिलेला अग्रलेख अतिशय अन्वर्थक व आम्हां साऱ्यांच्या भावना व्यक्त करणाराच वाटला. 'शारदा'प्रसंगीं 'काली'चे रूप घेऊं शकते तर !




दिलीप चित्रे ह्यांचे प्रवासवर्णन वाचले. त्यांच्या लेखनांत ब्लंटनेस फार आहे. मराठी माणसांना अजून त्याची संवय नाहीं. श्रीकान्त पुरोहित, कमलाकर धारप यांच्या कथा आवडल्या. प्रा. वसंत कानेटकर यांची मुलाखत आवडली. विशेषतः रिस्क घेऊनहि हा विचार मला महत्त्वाचा वाटला.

दिवाळी अंकाकडे डोळे लावून आहोंत.

आपला,

**मुंबई** **सदानंद सोनवणे**


मंत्री **'आश्वासनें'** देतात !
पुढारी **'आश्वासनें'** देतात !!
नगराध्यक्ष **'आश्वासनें'** देतात !!!
नगरपिते काय, पक्षनेते काय,
आजकाल कोणीही **'आश्वासनें'** देतात.

पण

ती **'पाळतातच'** असें नाहीं.

**दीपावली वार्षिक**

मात्र दिलेली **'सर्व आश्वासनें'** गेलीं **एकवीस वर्षें** पाळीत आहे.

१) उत्तम बहुरंगी मुखपृष्ठ व चित्रें
२) आकर्षक व अन्वर्थक सजावट
३) **'मानधनीं'**चे दर्जेदार साहित्य
४) **उदरविदारक** व्यंगचित्रें
५) संग्राहक कविता

आणखी कितीतरी !!

पुन्हां एकदां प्रत्यय घ्या !

[दीपावली दिवाळी अंक १९६५]





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका



# "'काश्मीर' एक दृष्टिकोन

—ले. क. रा. ह. लिमये (रिटा.)

**ऑगस्ट** १९६५ मध्यें पाकिस्तानी फौजांच्या ऑफिसर आणि सैनिकांनी लष्करी गणवेष फेकून देऊन काश्मीरचेच रहिवाशी असे वेषांतर केले आणि काश्मीरमध्यें आक्रमण करून नेहमीप्रमाणें लूटमार करण्यास सुरवात केली. ह्या सर्व कारवाया पाकिस्तानी फौजेनेच घडवून आणिल्या आणि त्यांना सक्रिय पाठिंबा दिला. त्यामुळें काश्मीरकडे सहाजीकच भारताचेच नव्हे तर सर्व जगाचे लक्ष वेधलें गेले आहे ह्यात नवल नाहीं.

काश्मीर प्रश्न कां व कसा निर्माण झाला ह्या संबंधी चर्चा करणे अप्रस्तुत ठरेल. पुष्कळ वेळा सरकारी धोरणावरती कडक टीका केली जाते. अशी टीका लोकसभेपासून ठिकठिकाणच्या सभामधून सुद्धां ऐकण्यात येते. अशी टीका अज्ञानामुळें असू शकेल अथवा वस्तुस्थितीकडे मुद्दाम दुर्लक्ष्य करून केवळ सरकारला दोष देऊन थोड्या श्रमात लोकप्रियता मिळविण्याकरिताही असण्याचा संभव आहे. तेव्हां वस्तुस्थिती काय आहे आणि सर्व साधारणपणें कोणत्या गोष्टींचा विचार करून धोरणे आंखली जातात हे आपणास पहावयाचे आहे.

विश्वाच्या आदीपासून युद्धे सुरू झाली आणि जगाच्या अंतापर्यंत ती चालूच राहाणार. शांतता हा शब्दच भ्रामक आहे. शांततेचा घोष ह्या केवळ वल्गनाच असतात. प्रत्येक व्यक्तीला अथवा राष्ट्राला आपली इच्छा नसतानाहि भांडणात अथवा युद्धात केव्हां भाग घ्यावा लागेल याची शाश्वती नसते. म्हणूनच शहाणी व्यक्ति आणि तसेच शहाणे राष्ट्र सगळीकडे शांतता दिसत असूनसुद्धां वेळ आली तर म्हणजेच युद्धास सज्ज असते.

शांततेचा प्रचार करणारी राष्ट्रे बलवान असतील तरच त्यांना जगात मान मिळतो आणि त्यांचे उपदेश ऐकिले जातात. बलवानाला समाजात किंमत असते कारण ऐकिले नाहीं तर दोन ठोसे मिळण्याची भीति असते. त्याचे उलट नेभळचाची कदर कधीच केली जात नाहीं. महात्माजींचा उपदेश असाच होता. त्यांना शूर सत्याग्रही पाहिजे होते पण भ्याडांना त्यांचे जवळ स्थान नव्हते. त्यांचा सर्व भर नैतिक आणि मानसिक धैर्यावरती होता. पण अशा धैर्याचे लोक विरळे. सर्व समाज अथवा राष्ट्र अशा धैर्याचे असणे अशक्य आहे. म्हणूनच नैतिक धैर्याला जोड म्हणून राष्ट्राला शस्त्रास्त्रे आणि युद्धाची इतर साधने ह्यांची मदत लागते.

आधुनिक युद्धशास्त्र हा एक अतिशय गुंतागुंतीचा विषय आहे. युद्ध शास्त्राचा पाया म्हणजे राष्ट्राचे धोरण. राष्ट्राचे धोरण चढाईचे असावे, बचावाचे, का बचावाकरितां चढाईचे असावे हे पहिल्या प्रथम ठरविले जाते. हे धोरण ठरविताना प्रामुख्याने खालील बाबींचा विचार केला जातो.

१ संभाव्य शत्रू

२ परराष्ट्रीय धोरण

३ आपले स्वतःचे संरक्षण दल.

४ युद्धामध्यें आपणास बाहेरून मिळविता येणारी मदत.

हे धोरण ठरविणे हें मध्यवर्ती मंत्रीमंडळाचे प्रमुख काम. पूर्ण मंत्री मंडळास तितका वेळ नसल्यामुळें मंत्रीमंडळाची एक पोट समीती खास संरक्षणाच्या प्रश्नांचा विचार करण्याकरितां नेमली जाते. हिचे नेतृत्व पंतप्रधान करितात. ह्या मंत्रीमंडळाचे पोट समितीस सल्लागार म्हणून स्थल, जल आणि हवाई सरसेनापतींची समिती असते. संरक्षण पोट समिती, सरसेनापतींच्या समितीचे विचार आणि साऱ्याकरितां निरनिराळे उद्भवणारे प्रश्न सुपूर्द करिते.

तज्ञ सरसेनापतींचा सल्ला सर्व साधारणपणें मानिला जातो. परंतु हा सल्ला परराष्ट्र राजकारणामुळें सरकारी धोरणाशी विसंगत असेल तर तो सल्ला पुन्हां फेरविचाराकरितां पाठविला जातो.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

**[ भारताचे माजी सर सेनापती ज. करिअप्पा यांच्याबरोबर सँढहर्स्ट येथें युद्धविषयक शिक्षण घेतलेले, सेवानिवृत्त सेनाधिकारी ले. कर्नल रा. ह. लिमये यांचा "एक्के"ली'साठीं खास लेख. राजकीय दृष्ट्या काश्मीर-विषयक चर्चा आपण वाचल्या असतील. पण लष्करी दृष्ट्या काश्मीरविषयक अशी ही चर्चा प्रत्यक्ष एक अनुभवी सेनानीच करीत आहेत. वाचकांना ती खास उद्बोधक व सध्यांच्या परिस्थितींत मार्गदर्शकही वाटेल असा विश्वास वाटतो—संपादक ]**

---

संरक्षण पोट समितीचा निर्णय हा संपूर्ण मंत्रिमंडळाचा निर्णयच ठरतो. त्यावर देशाचे म्हणजेच लोक नियुक्त लोकसभेचे शिक्का-मोर्तब होते.

आता आपण काश्मीरच्या प्रश्नाचा मध्यवर्ती मंत्रिमंडळाच्या संरक्षण उपसमितीच्या दृष्टिकोनांतून विचार करूं.

## संभाव्य शत्रू

भारताच्या पश्चिमेस काश्मीरवर सदैव डोळा ठेव-णारा मुख्य शत्रू म्हणजेच पाकिस्तान. शत्रुत्वास बरीच कारणें असूं शकतात. त्यांपैकी कांही म्हणजे धर्म, अधिक साम्राज्याची हाव, व्यापाराकरिता लागणारी आणि दुसऱ्याजवळ असलेला परंतु आपणाजवळ नसलेला कच्चा माल आणि अगदी आधुनिक म्हणजे दुसऱ्यावर जबरदस्तीनें स्वतःची मतप्रणालि लादण्याची ईर्षा. याखेरीजही अनेक कारणे असूं शकतात.

आपला दुसरा शत्रू म्हणजे चीन. चीनचे ध्येय काश्मीरचा उत्तरेकडील भाग म्हणजेच लडाख आपल्या ताब्यांत घेणें. स्थलसंकोचास्तव ह्या कारणांची जास्त मीमांसा करणें शक्य नाही.

संभाव्य शत्रूमध्येंच आणखी दोन वर्ग निर्माण होतात. पहिला वर्ग म्हणजे तटस्थ राष्ट्रांचा; व दुसरा वर्ग लढाईकरिता प्रत्यक्ष मदत न करता आपल्या शत्रूस सर्व दृष्टीनीं मदत व सहकार करणाऱ्यांचा हें शत्रुत्व आणि मित्रत्व परराष्ट्रीय धोरणाशीं अति-शय निगडित असते. त्याचा उल्लेख पुढे येईलच. सध्याच्या काश्मीरच्या लढयांत उघड उघड पाकिस्तानबरोबर सहकार्य करणारा आणि सढळ मदत करणारा देश म्हणजे चीन. तेव्हां पाकिस्तानबरोबर उघड उघड युद्ध पुकारणें म्हणजेच पर्यायानें चीनच्या आक्रमणाला आवाहन करणेंच होय. तेव्हां सरकारच्या आतापर्यंतच्या काश्मिरच्या धोरणावर टीका करणाऱ्यांनी हा महत्त्वाचा मुद्दा लक्षांत ठेवणे इष्ट आहे.

जगाचा इतिहास जर आपण पाहिला तर असें आढळून येईल. कीं, बव्हंशी लढाया धर्माकरितां केल्या जात असत. आधुनिक कालांत-सुद्धां धर्म हा दोन राष्ट्रांमध्यें मैत्री जोडण्यास उपयोगी पडतो, असेंच म्हणावें लागेल. सध्या जगामध्यें फक्त तीन धर्माचें प्राधान्य आहे. ख्रिश्चन, बौद्ध आणि मुसलमान. नेपाळ हा एक अपवाद सोडल्यास भारत हें एकमेव बहुसंख्य हिंदुराष्ट्र आहे. म्हणून केवळ या कारणाकरितांच भारताच्या संविधानामध्यें आपण निधर्मी राष्ट्र असून सर्व धर्मांना समपातळीवर मानलें आहे. ज्याप्रमाणें पाकि-स्तानची घटना इस्लामी धर्मावरच उभारली आहे त्याप्रमाणें आपण अट्टाहासानें भारताची उभारणी हिंदुधर्मावरच केली असती तर धर्मास्तिव काय घोटाळे उत्पन्न झाले असते याची कल्पनाच केलेली बरी.

आधुनिक जगाचे तीन भाग पडले आहेत. पहिला गट कम्युनिस्ट पक्षाचा. दुसरा कम्युनिस्टविरोधी आणि तिसरा भारत, लंका, युगोस्लाव्हिया, मिसर प्रमाणें तटस्थांचा. धर्मप्रमा-णेंच भारताला मतस्वातंत्र्याहि मिळालें आहे. सरकारची अपेक्षा इतकीच आहे कीं, कम्युनिस्टांनीं देशद्रोह करूं नये आणि भारताला दुसऱ्या देशाच्या अंकित करू नये. अशीच अपेक्षा पाकिस्तानी धार्जिण्या मुसलमानांकडूनहि केली जात आहे.

## परराष्ट्रीय धोरण

आधुनिक राजकारणांत प्रचार हें एक मोठें शास्त्र सम जलें जातें. हिटलरच्या जर्मनींत डॉ. गोएबल् हा प्रचारशास्त्रा-बद्दल प्रसिद्ध होता. खोटयाचेंहि खरे करण्याची त्याची हातोटी अवर्णनीय होती. परंतु अखेरीस भ्रमाचा भोपळा फुटला, आणि सत्य जगजाहीर झालें. हेंच प्रचाराचें तंत्र पाकिस्तान आणि चीन ह्या आपल्या दोन्हीं शत्रूंनीं आत्मसात् केलें आहे. स्वतः आक्रमण करून भारताने आक्रमण केल्याचा कांगावा करण्याची संधि ते गमावीत नाहींत. परंतु ह्या वेळीं सुद्धां सत्य जाहीर झालें आहे.

आंतरराष्ट्रीय राजकारणाचा पाया म्हणजे राजकारणाचे डाव अशा तऱ्हेनें खेळणें कीं, युद्धकालीन परिस्थितींत आपल्याला शत्रू, शक्य तितके कमी राहून, मित्र जास्त मिळावेत. जर मित्र मिळणें अशक्य होईल तर शत्रूशी सहकार्य न करतां किंवा त्याला मदत न देता इतरांनी तटस्थ तरी रहावे असे प्रयत्न असावेत. हे राज-कारण उघड उघड सांगता येण्यासारखे नसते, आणि वेळ प्रसंगीं नेभळेपणाबद्दल प्रखर टीकाही सहन करावी लागेल.

सध्याचा आपला शत्रू पाकिस्तान त्याचे जीवश्च कण्ठश्च मित्र म्हणजे पूर्वीपासूनचे इंग्लंड आणि अमेरिका आणि नवीन लाल चीन. ह्यांना पाकिस्तानपासून फोडण्याचे आपले प्रयत्न चालू होतें. इंग्लंडला मुसलमानांच्याबद्दल पहिल्यापासूनच प्रेम होते, आणि अजूनहि आहे. ह्याचें कारण इंग्रजांचे मध्यपूर्वेमधील मुसल-मानी राष्ट्रांमध्यें असलेले वर्चस्व, म्हणजेच तेलांच्या खाणी, दृढ करण्याचें असावें.

उत्तरी पाकिस्तानचा बराचसा भाग चीन आणि रशिया ह्यांच्याशी संलग्न आहे. सर्व बाजूंनीं रशिया आणि चीन ह्यांची नाकेबंदी करण्याची अमेरिकेची महत्वाकांक्षा. म्हणूनच शक्यतो-पर्यंत आपल्या हवाई आणि आरमारी तळांच्या सुरक्षिततेकरितां पाकिस्तानची मनधरणी, असेंहि अमेरिकेचें राजकारण असूं शकेल.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

☆ घर म्हणजे आसरा नव्हे, निवारा नव्हे.

☆ भिंतींचा शोध लागला आणि कळपांत राहणारा माणूस कुलुपांत राहूं लागला.

☆ उभा ताजमहाल पाहून "इतका पैसा ओतून सैंपाकघर बांधायला विसरला कीं तो औरंगजेब...."

मराठीतील एक सिद्धहस्त विनोदी लेखक

श्रीयुत पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे

ह्यांनीं 'दीपावली' वार्षिकासाठीं लिहिलेला

"हीं घरें, तीं घरें"

हा खास प्रदीर्घ लेख !

[ अर्थातच खास "पु. ल."टच्चाच ]

ह्या घरांतून वावरतांना तुम्हीं खदखदां हंसाल. कधीं गंभीर व्हाल, तर कधी रुमालानें डोळेही पुसाल, पण तरीही हीं घरें 'आपली' वाटतील. आवडतील !!

त्यासाठीं

दीपावली दिवाळी अंक

१९६६

मिळवा ! वाचा ! खदखदून हंसा !

परंतु पाकिस्तानची चीन बरोबर मैत्री घटकोघटकी वाढत असल्यामुळें अमेरिकेची पाकिस्तानवरील नाराजी साहजिकच आहे. आतापर्यंत अमेरिका आणि इंग्लंडनें पाकिस्तानला चीनच्या विरोधाकरितां आर्थिक आणि शस्त्रास्त्रांनीं अतोनात मदत केली. ह्या मदतीअन्वये मिळालेले शस्त्रसाहित्य हिन्दुस्तानाविरुद्ध वापरलें जाऊ नये अशी एक अट होती. ती अट पाकिस्ताननें किती पाळली हें आता जगजाहीर झालेंच आहे. पाकिस्तानचें दुटप्पी धोरण पाहून खुद्द इंग्लंड आणि अमेरिका येथील जनतेनहि पाकिस्तानविरुद्ध काहूर उठवलें आहे. त्यामुळें भारताच्या दूरदृष्टीच्या राजकारणाचें फळ आज आपणास मिळत आहे. ह्यापुढें ह्या दोन राष्ट्रांकडून उघडपणें शस्त्रास्त्रांचें सहाय्य पाकिस्तानला मिळणें जड जाईल असें गृहित धरून चालण्यास हरकत नाहीं.

कम्युनिस्ट गटाचा अध्वर्यु म्हणजे रशिया. पहिल्याप्रथम पाकिस्तान, इंग्लंड, अमेरिकेचे पदरास धरून चालणारा असल्यामुळें रशियाचा त्याचेवर रोष होता. पाकिस्ताननें चीनशीं संबंध जोडल्यापासून हा रोष कमी झाला. परंतु एक गोष्ट निर्विवाद आहे कीं जें युद्धोपयोगी साहित्य रशियाकडून आपणास मिळत आहे तें आतापर्यंत पाकिस्तानला मिळालेले नाहीं आणि पुढें मिळण्याची विशेष शक्यताहि दिसत नाहीं.

राष्ट्र संघ (यू. एन्. ओ. ) ह्या जागतिक संस्थेची माहिती सर्वांना आहेच. सुरवातीपासून ह्यामध्यें इंग्लंड आणि अमेरिकेचें वर्चस्व होतें आणि अजून आहे. त्यांना शह देण्यास केवळ रशिया समर्थ आहे. आतापर्यंत ज्या ज्या वेळेंस इंग्लंड व अमेरिकेनें भारताची बदनामी करण्याचा प्रयत्न केला तेव्हां रशियानें भारताच्या मदतीस येऊन आपल्या खास अधिकारांचा उपयोग करून भारतावरील हें संकट टाळलें. आतापर्यंत जगांतील तीन प्रमुख राष्ट्रांचा आपण विचार केला. ह्यावरून हेहि सिद्ध झालें आहे कीं, पाकिस्तानची बाजू जास्त जास्त लंगडी होत चालली आहे आणि आपण बव्हंशीं राजकीय क्षेत्रांत तरी पाकिस्तानला एकाकी करण्यास समर्थ ठरलो आहोत. सतत अठरा वर्षे पाकिस्तानचे चिमटे सहन करून आणि वेळप्रसंगी स्वतःवर नेभळेपणाचा आरोप लादून घेऊन आज आपण उघड उघड पाकिस्तानच्या एका ठोशाला प्रत्युत्तर म्हणून एक अथवा अधिक ठोसे देण्यास जगाचे दृष्टीनें न्याय्य ठरलो आहोत.

### आपले स्वतःचें संरक्षक दल

सर्वांना माहितच असेल कीं, राष्ट्राचें संरक्षण दल स्थल, जल आणि वायु अशा तीन सेनांमध्यें विभागिलेलें असतें. प्रत्येक सेनेची संख्या त्या राष्ट्राच्या भौगोलिक परिस्थितीवर अवलंबून असते याखेरीज सेनांची संख्या निश्चित करण्यापूर्वी संभाव्य शत्रूचाहि विचार करावा लागतो. भारताचा समुद्रकिनारा अंदाजे तीन हजार मैल लांब असला तरी संभाव्य शत्रूंचा विचार करता स्थलसेना आणि वायुसेना ह्यांच्यावरतीच भर देणें

(पृष्ठ ५६ वर पहा)


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# धुकें

— ना. व्यं. देशपांडे

**पहांटे मी त्या दुकानांत शिरलो. तिनें मला तो पुष्पगुच्छ काढून दिला. तो देतांना तिचा स्पर्श मला झाला, ती सुंदर होती कीं तो स्पर्श ?.... धुक्याच्या पडद्यांतून मी निघालो — ह्या प्रश्नाचें उत्तर शोधीत...**



**ज्याच्यासाठीं** मुंबईंत सारा जन्म काढावा, उन्हाळ्यांतला घामटपणा सोसावा, पावसाळ्यांतलें तांडव अनुभवावें, अफाट गर्दींत हरवलेल्या आपल्या व्यक्तिमत्वाचीही पर्वा करूं नये असा हिंवाळा हा एकच ऋतु ! गोड हिंवाळा प्यायचा असें जें म्हणतात, त्याचा अनुभव मुंबईंतच घ्यावा. तोच पीत मी रस्त्यानें चाललों होतो. रस्त्यावर अद्याप शांतता वावरत होती. आसमंतात दाट धुकें पसरलें होतें. प्रिय सखीच्या निकट सान्निध्याची विलक्षण ओढ वाटावी इतक्या बेताची थंडी त्या धुक्यांत बेमालूमपणें मिसळली होती. मला जायचें होतें विमानतळावर. माझ्या स्नेहचुंबकाच्या आकर्षणक्षेत्रांत आलेल्या एका व्यक्तीला निरोप द्यायचा होता. परदेशीं सपत्नीक चालली होती ती व्यक्ति. कधीं विमानतळावर जाण्याचा प्रसंगच आला नव्हता आजवर. किंवा विमान जवळून पाहण्याचा योगही आला नव्हता. स्वतः त्यांतून प्रवास करण्याचें तर दूरच ! अद्यापही वरच्या घुमटांत विमानाची घिरघिर ऐकूं आली कीं, स्वतःचें वय चोरून मी आकाशांत पाहात राहतो. विमानांतल्या त्या छान् छान् पोशाखांतील व्यक्ति, ती हवाईसुंदरी वगैरे वगैरे गोष्टींभोंवतीं माझ्या मनांत अद्भुततेची वलयं अद्याप घर करून आहेत. चार-पांच दिवसांपूर्वीं विमानतळावर जाणार असल्याचें मी स्नेहीमंडळींत सांगितलें तेव्हां कोणीतरी सुचविलें कीं, जातांना एखादा पुष्पगुच्छ घेऊन जा. मला हे रीतीरिवाज माहित नव्हते. पण सदिच्छा म्हणून परदेशी जाणाऱ्या व्यक्तीला पुष्पगुच्छ घेऊन जायचें ही कल्पनाच मला इतकी आवडली कीं, माझ्या अंगांगावर फुलांचा मृदु, शीतल, सुगंधी स्पर्श एकसारखा जाणवूं लागला.

पण कसला गुच्छ द्यायचा ? एखाद्या मंडळांत वक्त्याला भाषणाच्या अखेरीस आभाराचे रटाळ चार शब्द बोलून अर्पण करतो तसला बांधीव गुच्छ ? मला तसल्या गुच्छाचें कधींच आकर्षण वाटलें नव्हतें. सारीं फुलें—बहुधा शेवंतीचीच—कशी गच्च आवळून जवळ जवळ बसवलेली. आजूबाजूला कसल्यातरी हिरव्या पाल्याचें अवगुंठन. कलावतूच्या धाग्याचे चार-पांच वेढे. अधूनमधून चकाकणारे रंगीत वेगडी कागद. सारें कसें जखडून टाकलेलें. मला पुष्कळ वेळां वाटत असतें कीं, त्या गुच्छांतील फुलांना फार उकडत असावें. गुदमरत असावें. कुणीतरी सुचविलें, 'अरे आतां नवीन पद्धत निघाली आहे बुके देण्याची. एखाद्या 'Florist' अशी पाटी असलेल्या दुकानीं जा आणि चौकशी कर.'

दोन दिवस तसल्या दुकानाची चौकशी करण्यांत घालवले. एक दिवस सांपडलें. म्हणजे कालचीच गोष्ट. देवळांत जातांना ओवऱ्यांच्या आजूबाजूला हारीनें असणारी फुलवाल्यांची दुकानें मी पाहिली होती. मला कधींच असल्या दुकानांचें आकर्षण



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

योजनगंधा—

लंडनच्या विमानतळावर उतरलों आणिमाझे लक्ष वेधून घेतले तें त्या पातळांतल्या बाईनें—

तिचें नांव होते "शहीन वासीफ"

—अच्युत बर्वे

येत्या दिवाळी अंकांतील 'एक अविस्मरणीय स्त्री'

वाटलें नव्हतें. मोठ्या श्रद्धेनें देवळांत पाऊल टाकण्यापूर्वी फुलांची पुडी अथवा हार, कुंकू, कापूर, उदबत्ती वगैरे घेतलें असेल कधीं तरी. पण असल्या कुठल्याच दुकानाची वा दुकानदाराची छबी माझ्या लक्षांत राहिलेली नाहीं.

कालचें फ्लोरिस्ट्‌चें दुकान पाहून मात्र मी गंधखुळा, रूपखुळा झालों. दुकान फार मोठें प्रशस्त नव्हतें. तरीपण तें दुकानासारखें वाटत नव्हते. एखाद्या अभ्यागताला विश्रांति घेण्यासाठीं सजवलेली एखादी खोलीच ! वरच्या छपरावर गारव्यासाठीं, पुष्कळ पर्णसंभार असलेल्या वेली सोडलेल्या होत्या. प्रवेशद्वाराच्या उजव्या हातालाच एक वेत-शीर लांबरुंद असलेल्या एका कठड्यावर प्लॅस्टिकच्या स्वच्छ रंगीबेरंगी बादल्या ठेवल्या होत्या. जवळ जवळ संपूर्ण फुलझाडेंच नाजूकपणें कापून त्यांत ठेवली होती. निशिगंध इतक्या विविधरंगांत कसा ? मी दुग्ध्यांत पडलों. नंतर लक्षांत आलें कीं, कांहीं फुलांवर तांबूस, निळसर अशा वेगवेगळ्या रंगाचा नाजूक शिडकावा केला होता. दुसऱ्या बादलींत पांढरी लिली होती; एकांत ग्लॅडियोलिस्, तिसऱ्यांत ट्यूलिप्स, चौथ्यांत व्हायोलेट रंगांची कसलीशीं फुलें, पांचव्यांत फिकट पिवळ्या रंगाचीं. सहाव्यांत माझ्या आवडत्या गुलाबांचे टपोरे कळे. त्या फुलांच्या चेहेऱ्यावर कसलेंही दुःख वा दैन्य आढळलें नाहीं. तीं हिरमुसलीं झालेलीं नव्हतीं. त्यांचा संपूर्ण देहच बुडून त्या बादलींत ठेवल्या-मुळें, जीवाची कुत्तरओढ झालेल्या मध्यम-वर्गीय माणसांसारखी ती मुळींच दिसत नव्हती. दुकानांत तशी गर्दी फार नव्हती. एका लहानशा टेबलापुढें बसून पावत्या फाडणाऱ्या मुलाला मी दर विचारले.

"चार, पांच, सहा, दहा रुपयांपर्यंतचे बुके तयार करून देऊं. तुम्हाला कसला पाहिजे बोला ?"

बुके कसा दिसतो हें कोणा लेकानें पाहिलें होतें ? वरें, बुकेच्या आकारावरून किंमतीचा अंदाज करावा म्हटलें तर तेथें गुच्छांचे नमुनेच नव्हते. अधिक चौकशी करावी म्हटली तर आपलें पितळ उघडें पडायचें. तरीपण धीर धरून त्या प्लॅस्टि-कच्या बादल्यांकडे बोट दाखवीत मी विचारलें. "ही सगळ्या प्रकारची फुलें त्यांत असतील ना ?"

"हो तर." त्या पोऱ्यानें उत्तर दिलें.

पहिल्या वर्गांतून प्रवास करण्याची कुवत नाहीं व तिसऱ्या वर्गांतून जाण्यांत अभिमान दुखावतो म्हणून दुसऱ्या वर्गाचें तिकीट काढावें, अशा आविर्भावांत मी बोललों.

"पांच रुपयांचे दोन तयार कर."

"वरं." त्यानें ॲडव्हान्स घेऊन पावती फाडली.

"उद्यां साडेसाताला तय्यार पाहिजे हं." मी पुनः पुनः बजावलें.

—माझ्या घड्याळांत आत्तां कुठे ७। वाजत होते, दुकान आतां अर्ध्या फर्लांगच्या टप्प्यांत. होतें. धुक्यामुळें तें दूरदूर वाटत होतें. बरोबर साडेसात वाजतां तेथें पाऊल टाकायचें, गुच्छ घेऊन एकादी चुकार टॅक्सी पकडून विमानतळाकडे कूच करायचें असा माझा बेत होता.

धुकें फारच आस्ते आस्ते वितळत होतें. तसें तें हळूंहळू शरीरांतही पाझरत होतें. आणि साऱ्या कुरुपतेचा नाश करीत होतें. आजूबाजूला कुरुप असें कांहींच दिसत नव्हतें. रस्त्याच्या कडेला एक वठलेलें झाड आणि त्यावर मूकपणें पंख मिटून बसणारा कावळाही त्यावेळीं मला विलो-भनीय वाटला. एक मरतुकडें कुत्रेंही मोठ्या उत्साहानें कशाच्यातरी पाठीमागें धांवत धांवत गेलें आणि त्या धुक्याच्या पडद्याआड क्षणार्धांत अदृश्य झालें !

दुकान जवळ आलें तशी माझी पावलें मंदावलीं. माझें कठड्याकडे लक्ष गेलें. कालच्यासारखीच आकर्षक रीतीनें मांडून ठेवलेलीं फुलें ! फुललेल्या गुलाबांच्या मोठाल्या पाकळ्यांवर ओथंबणारें दंव पिऊन घ्यावें अशी मला तीव्र इच्छा झाली. शर्टाच्या खिशांतील कालची पावती चांचपडत मी आंत प्रवेश केला.

"येस् ?"

त्या प्रश्नानें मी आश्चर्यचकित झालों. कालचा पोऱ्या तेथें नव्हता. सुमारें सतरा अठरा वर्षांची एक कोंवळी खिस्ती तरुणी होती. या सुंदर धुक्यांत त्या पोऱ्याऐवजीं हीच असणें किती योग्य आहे असा विचार मनांत चाटून गेला. रविवार असल्यानें नीट नेटका पोषाख करून ती चर्चमधून नुकतीच परतली असावी असा माझा कयास होता. कारण तिच्या शरीरांभोंवतीं ताजेपणाची, टवटवीतपणाची वर्तुळें एकमेकांना छेद देत फिरत होतीं. दिसायला चांगली ऐटबाज होती. पण भडकपणाचा हव्यास नसावा हें ओठांवर हळुवारपणें चुंबलेल्या लिपस्टिक्‌वरून ध्यानीं येत होतें.

मी क्षणभर बोललों नाहीं.

"येस् ?" तिनें पुनः विचारलें तेव्हां भानावर आलों.

बोटाच्या चिमटींत धरलेली पावती मी हजर केली. तिनें पावती वाचली.

तिनें इकडेतिकडे सराइतासारखें पाहिलें. एका कोपऱ्यांत दोन देखणे पुष्पगुच्छ उभे होते. बुंध्याशीं पारदर्शक सिलोफिन् कागदांत वेष्टिलेले. ते दोन्हीं हातांत घेऊन माझ्यापुढें ती तिच्या नैसर्गिक डौलांत उभी राहिली. किंचित् हंसली असावी. मी लगबगीनें ते गुच्छ हातीं घेतले. पँटच्या खिशांत घडी करून ठेवलेली कापडी पिशवी

(पृष्ठ ५८ वर पहा)



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

नव्या सुधारलेल्या **सनलाइटनें**

# प्रत्येक वेळीं... आपले कपडे अधिक चमकदार धुवून निघतात!




नवा सुधारलेला सनलाइट एकदां अवश्य वापरून पहा. कपडे त्यानें किती अधिक चमकदार धुवून निघतात, किंबहुना प्रत्येक धुलाईला ते कसे अधिक चमकदार होत जातात, हें आपल्या सहज प्रत्ययास येईल. सनलाइट कपड्यांस थोडासा चोळतांच फेसच फेस येतो...त्यानें आपले कपडे अधिक स्वच्छ... अधिक चमकदार होतात. आपले सर्व कपडे नव्या सुधारलेल्या सनलाइटनें धूत जा.

**आपल्या रोजच्या कपड्यांच्या धुलाईसाठीं नवा सुधारलेला सनलाइट वापरा**

लिंटास-S60-140 MA

हिंदुस्तान लीव्हरचें उत्पादन





मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका



# क्लिओपात्रा

—डॉ. प्र. न. जोशी

**बारा वर्षांची मुलगी विचारीत होती, "अप्पा, क्लिओपात्रा आणि कान्होपात्राचे कांहीं नाते होते?" आणि मी विचार करूं लागलो.**

**क्लिओपात्रा**-कान्होपात्रा ! दोनही व्यक्तींत कांहींतरी साम्य आहे कां ? परंतु बारा-तेरा वर्षांच्या माझ्या मुलीनें एकदा मला प्रश्न विचारला, 'अप्पा, क्लिओपात्रा व कान्होपात्रा या दोघींचे कांहीं नाते होतें ?' या प्रश्नाचे उत्तर आज किती तरी दिवस मी शोधतो आहे. क्लिओ पात्रा व कान्होपात्रा; दोघींही आपापल्या यौवनाबद्दल, सौंदर्याबद्दल प्रसिद्ध होत्या. सर्वश्रेष्ठ अशा राजाची, बादशहाची वा सेनापतीची नजर दोघींच्यावरही गेलेली होती. दोघींचे जीवन रोमहर्षक घटनांनीं भरलेले, दोघींच्या नांवांत थोडेफार साम्य. दोघींचा अंत एका विशिष्ट तऱ्हेनें अद्वितीय असा झालेला.

परंतु ही साम्यें अगदीं वरवरची आहेत. दोघी जातीनें स्त्रियाच होत्या यास जेवढा अर्थ; तेवढीच किंमत या साम्याला आहे. तसे पाहिल्यास दोघींची तुलनाच कुणी करूं नये. एक इसवीसनापूर्वीची होऊन गेलेली इजिप्तची सौंदर्य सम्राज्ञी, दुसरी पंधराव्या शतकांतील पंढरपूर जवळील मंगळवेढे येथील नायकिणीची मुलगी. एकीवर सीझर, अँटॉनीसारखे रोमन सेनापती-सम्राट फिदा झाले तर दुसरीवर बिदरचा बादशाहा खूष होऊन गेला. एकीच्या अद्‌भुतरम्य चरित्रावर कथा, काव्ये, नाटके, चित्रपट यांचा सतत वर्षाव होत राहिला तर दुसरी आपल्या क्षेत्रांत कां होईना पण थोडी फार प्रसिद्ध आहे. एकीच्या जबरदस्त साम्राज्यविषयक महत्त्वाकांक्षेमुळें फार मोठा रक्तपात, कत्तली, युद्धें, हेवेदावे, कटकटी हा प्रकार सतत होत राहिला; तर दुसरीचें आयुष्य त्यामानानें कितीतरी संथ व सरळ असे होते. काळ, स्थळ, वृत्ती, परिणाम यांतील हा भेदसुद्धां तसा वरवरचाच आहे. दोघींच्या प्रवृत्तींत जमीन अस्मानाचे अंतर आहे. एक विषवल्ली आहे, दुसरी जाईलता आहे; एक प्राणघातकी विद्युल्लता आहे, दुसरी समईची सौम्य ज्योत आहे, एक भयानक वावटळ आहे, दुसरी शांत अशी वायुलहर आहे. एक स्त्री जातीची उद्दाम प्रतिकृती तर दुसरी स्त्रीची स्वाभाविक शीतल मूर्ती आहे. दोघींच्यामध्यें तुलनाही करणे उचित नाहीं हे खरेंच; परंतु प्रश्न उपस्थित झाला आणि मनांत विचारलहरी स्फुरित झाल्या.

दोघींच्या आयुष्याची दिशाच भिन्न होती. एकीचे जीवन उपभोग, सौंदर्यासक्ती, साम्राज्यलालसा यांनीं भारावलेले होते; दुसरीचे सात्विक वैराग्य, अनासक्ती, निर्लोभी वृत्ती यांनीं सुशोभित झाले होते. एकीस भयंकर असा आत्मघात करावा लागला; दुसरीनें स्वानंदात रममाण होऊन आत्मार्पण केले. एक पूर्ण विकसित अशी आसुरी लतिका होती; दुसरी अर्धविकसित अशी दैवी कलिका होती. एक कैफ चढविणारी मद्याची सुरई होती, दुसरी सुवासिक फुलांची परडी होती. परंतु या शाब्दिक रूपकांपलीकडे असणारा भेद दोघींत होता. दोघींचीही कीर्ति आजही सर्वत्र असली तरी स्त्री जातीच्या इतिहासांत एकीनें कृष्ण रंग फासला आहे, दुसरीने सौम्य, सुखद असा नीलवर्णाचा मुलामा दिला आहे.

क्लिओपात्रा ही इजिप्तच्या टॉलेमी ऑलेटिसची लावण्यवती मुलगी. ही इजिप्तची राजकन्या असली तरी तिच्यांत






अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट



# कान्होपात्रा

मॅसिडोनियनचे ग्रीक रक्त सळसळत होते. झुंज, महत्त्वाकांक्षा, अभिमान, आसक्ती, लोभ, पिपासा हे या रक्ताचे गुणधर्म. अलेक्झांडर दि ग्रेटबरोबर इजिप्तमध्यें आलेल्या एका ग्रीक सेनापतीचें रक्त तिच्या अंगांत उसळत होते. तिचे सौंदर्य, तिचे वाक्चातुर्य, तिचे बुद्धिवैभव, तिची महत्त्वाकांक्षा यांना त्या काळांत कुठेंच तुलना नव्हती. चित्रकारी, खोदकला, काव्य, तत्त्वज्ञान, धर्मविषयक विचार यांशी तिचा परिचय नव्हता असे नाहीं, परंतु एकंदर जीवनांत यांचा परिपाक उतरलेला नव्हता. तिचे शौर्य वाखाणण्यासारखे होते, तिची मुत्सद्देगिरी प्रसिद्ध होती. तिचे लाघव मी मी म्हणणारास भुरळ पाडी. देखणा, पराक्रमी पुरुष तिच्यावर भाळून जाई; तीही त्याच्या नादांत वेडावून जाई. परंतु तिच्या नादी स्वभावात एक भक्कम सूत्र होते. आपणांस इजिप्तची, रोमची सम्राज्ञी व्हावयाचे आहे याचा विसर तिला कधींही पडला नव्हता. त्यासाठीं तिचे सारे लाघव असे. रंगीबेरंगी मयुरपिसांचा पिसारा दुसऱ्यास गुंतविण्यासाठीं तिच्याजवळ होता. शाश्वत स्नेहाचा डोळा असणारे पीस त्यात नव्हते. तिच्या सौंदर्याचे सामर्थ्य एवढे मोठें कीं, सारे रोमन राज्य केवळ इजिप्तचा एक भाग व्हावा असा घाट तिनें घातला होता.

क्लिओपात्राचे टॉलेमी घराणें तसे फार प्रसिद्ध असले तरी अत्यंत क्रूर पुरुषांच्या लीलांनीं त्यांचा सारा इतिहास बरबटलेला आहे. पहिला टॉलेमी, लोकपाल म्हणून याच्या नांवाचा अर्थ, परंतु यानें अनेकांची शिरें कापून काढली. भयानक रक्तपात केला. दुसरा टॉलेमी याच्या नांवाचा अर्थ बंधु प्रेमाचा आदर्श; परंतु यानें आपल्याच दोन भावांचे खून केले. टॉलेमी चौथ्यानें आपल्या आईचा व चुलत्याचा वध केला. टॉलेमी सातव्यानें भीषण कत्तली केल्या. टॉलेमी तेरावा हा क्लिओपात्रेचा जनक असून याचे नांव 'फ्लूट प्लेअर' असें होते; पण यानें आपली मुलगी वर्नीस हिचा खून करून पुनः शोकगीत रचून गाईले ! परंतु याच टॉलेमी राजांनीं इजिप्तचे, अलेक्झांड्रियाचे वैभव वाढविले. साहित्य, संगीत, नृत्य, चित्रकला, शास्त्रादि विषय यांची समृद्धी याच काळांत झाली. परंतु याच ऐहिकाच्या तीव्र लालसेंतून विनाशाची बीजें फोफावत गेली.

हिच्या वयाच्या सतराव्या वर्षी हिचे वडील मरण पावले. साम्राज्यास वारस फक्त एक तिचा भाऊ होता. त्याचा निकाल लावण्यासाठीं त्यावेळीं अलेक्झांड्रियांत असलेला रोमन सेनापती ज्यूलिअस सीझर याची मदत तिनें मागितली. मदत तिला उघड रीतीनें मागता येईना. भावाची पाळत तिजवर होतीच. शिवाय जूलिअस सीझरला आपल्या मायिक सौंदर्यानें जिंकावे व साऱ्या रोमन साम्राज्याची राणी आपण व्हावे अशा स्वप्नांनीं ती खुलून गेली होती. भावास नष्ट करावे, सीझरला स्नेहपाशात ओढावे आणि आपण दिमाखानें सम्राज्ञी म्हणून मिरवावे ही तिची मुख्य महत्त्वाकांक्षा.

पॉंपी येथील विजयानें सुखावलेला सीझर अलेक्झांड्रियांतील एका राजवाड्यांत इजिप्तच्या राजकारणाचा विचार करीत होता. वेळ सकाळची होती. एकाएकी थोडी गडबड झाली. एक हुजऱ्या सीझरपाशी येऊन सांगू लागला, 'सरकार, खाली दाराशी एक फिरस्ता मनुष्य चांगले गालिचे घेऊन आला आहे. इजिप्तची कलाकुसरच पाहाच म्हणतो. कुणी त्याला वर सोडीत नाहींत.' सीझरला एवढीच बातमी पुरेशी होती. विविध कलांचा बादशहा म्हणजे सीझर होता. उत्तमोत्तम गालिचे पाहावयास काय हरकत आहे ? त्यानें त्या फिरस्त्यास वर भेटीस बोलाविले. त्याच्या जवळची एखादी उत्तम वस्तु आपली बायको कॅलपूर्निया हीस पसंत पडेल. नाहीं कसें म्हणावे ? सीझरचा हुकूम झाला व फिरस्ता गृहस्थ गालिच्यांच्या भारानें वाकलेला आत आला; आणि म्हणाला, 'सरकार, मी आपणांस अशी वस्तु दाखवीन कीं, आपण कधीं पाहिली नसावी ! एकदम खूष होऊन जाल.' त्यानें एक मोठा गालिचा खाली, संगमरवरी फरशीवर ठेऊन तो गुंडाळलेला उलगडण्यास सुरुवात केली——

आणि सीझरनें कधींही न पाहिलेली एक दिव्य सौंदर्यमूर्ती गालिच्यांतून बाहेर पडली. इजिप्तची सौंदर्यसम्राज्ञी क्लिओपात्रा सीझरच्या पुढें उभी होती ! तिचे





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

केस अस्ताव्यस्त झाले होते, कपडे इकडचे तिकडे झाले होते, तिच्या लावण्यप्रभेनें रोमन सेनापति चकित होऊन गेला. तिचा बांधा, तिचे नितळ शरीर, तिचे बोलके डोळे, तिचे गुलाबी गाल व ओलसर ओठ आणि तिचे लाघवी हास्य यांनीं सीझर विरघळून गेला. ऐन वयांत असतांना त्यानें कांहीं थोडी चैन केली नव्हती. रोमच्या प्रत्येक सौंदर्यवती स्त्रीचा पती म्हणून त्यानें पूर्वी लौकिक मिळविला होता. परंतु आता यावेळींही त्याचे वय बावन्न वर्षांचे असले तरी त्याच्या डोळ्यांना समोरचे लाघव पाहून भुरळ पडलीच. सर्वजणास जिंकावयास निघालेला हा रोमन सेनापती क्लिओपात्रेचा गुलाम झाला.

त्याच्या मदतीनें प्रथम क्लिओपात्रानें आपल्या भावाचा नायनाट केला. इजिप्तचे सिंहासन निर्वेध करून घेतले. मग तिचे सर्व लक्ष सीझरकडे वळले. तिला त्याचे 'तारुण्य' नको होते, त्याचा रुवाब नको होता, तिला रोमची सम्राज्ञी व्हावयाचे होते ! नाईल नदीवरच्या एका आलीशान जहाजावर तिनें सर्व ऐश्वर्याचे प्रदर्शन भरवून सीझरला बोलाविले. सीझरही खुषीत होता. क्लिओपात्रास नादी लावून इजिप्तचे राज्य आपण घ्यावे असा त्याचा विचार आणि सीझरच्या मदतीवर आपण जगाची राणी व्हावे असा तिचा प्रयत्न होता. या त्यांच्या परस्परांच्या आकर्षणांतून त्यांना एक मुलगाही झाला. रोज हास्य विलास, नृत्यगायन, खेळ, सहली यांची लयलूट होत असतानांच

स्वच्छता व टापटीप यामुळें लोकादरास पात्र झालेले
मामा काणे यांचे
स्वच्छ उपहार गृह
(स्थापना १९१०)
दादर, मुंबई २८.
B.Y.P.

इजिप्तमधील सीझरचे शत्रु जागे झाले. इजिप्त जिंकायला गेलेला सीझर कुठे अडकला ? काय झाले त्याचे ?

सीझरच्या विरुद्ध कट शिजू लागले. परंतु सीझर आपल्याच स्वप्नांत दंग होता. रोमच्या राज्यावर आपण येणार, क्लिओपात्रा राणी होणार, साऱ्या प्रजाजनांचे डोळे दिपणार; अशाच ऐश्वर्यशाली कल्पनांत तो रमून गेला होता. रोमला एक मोठे मंदिर उभारले जात होते. त्यात सीझर व क्लिओपात्रा यांच्या मूर्ती प्रचंड आकाराच्या बसविल्या जाणार होत्या. पण रोमच्या लोकांना हा प्रकार पसंत नव्हता. इजिप्तची राजकन्या रोमची राणी ? कुणी कुणास जिंकले ? सिसॅरोसारख्या प्रमुखानें एक सारखा विरोध करण्यास प्रारंभ केला. तिकडे सीझरच्या राज्यारोहणाची तयारी पूर्ण होत राहिली. परंतु सारेच विचित्र व भयानक घडले. सीझरच्या मस्तकावर राजमुकुट तर चढला नाहीच. तर त्याच्या अंगावर तेवीस सुऱ्यांचा वर्षाव होऊन तो गतप्राण झाला. क्लिओपात्राच्या आकांक्षावर पाणी पडले. उदास होऊन ती परत इजिप्तमध्यें आली. तिच्या साऱ्या आशा धुळीस मिळाल्या; तरी तिथेंही चिवट अंकुर जीव धरून राहिलाच.

पुनः याच नाट्याची उभारणी झाली. सीझरपेक्षां अधिक रूपवान, अधिक तरुण, अधिक उमदा रोमन सेनापति मार्क अँटॉनी क्लिओपात्राच्या स्नेहजालांत सांपडला. रोमन साम्राज्याचा विस्तार करण्यासाठीं हा विजयी वीर पूर्वेकडील देशांत निघाला. याच प्रवासांत त्यांस क्लिओपात्रा भेटली. पुनः तेच लाघव, तेच हास्य, तोच विलास, तेच चातुर्य. क्लिओपात्रानें आपला पाहुणा म्हणून अँटॉनीस 'राजकारण-विषयक गोष्टींची' चर्चा करण्यास बोलाविले; आणि स्त्रीदाक्षिण्य म्हणून कांहीं असते ना ! ते या भावड्या रोमन सेनापतीनें पाळले. क्लिओपात्राचे सारे ऐश्वर्य व तिचे लावण्य पाहून अँटॉनी चकित झाला. व्हीनस देवतेसच शोभतील अशी उंची व पारदर्शक तिची तलम वस्त्रें होती. तिच्या डोळ्यांतील मादकता काळजास भिडणारी होती आणि आपण गांवढळ रोमन वाटूं नये म्हणून अँटॉनी स्वतःकडून काळजी घेत होता. तो तिच्या आहारीं गेला. तिचे पुनः सम्राज्ञी होण्याचे स्वप्न क्षितिजावर आले.

आणि पुनः तेच भापण नाट्य घडण्याचा प्रसंग येऊन ठेपला. रोममधील अँटॉनीचे साथीदार बिघडले. त्याची बायको ऑक्टॅव्हिया इजिप्तमध्ये वस्तुस्थिती पाहाण्यास येऊन निराश होऊन परत रोमला आली. तिच्या भावानें सूडाचे निशाण उभे केले ! रोमन सैन्य इजिप्तवर, अँटॉनीवर चाल करून आले. अँटॉनीची तयारी मोठीच होती. त्यानेंही लढाईची तयारी केली. प्रथम क्लिओपात्रेशी लग्न केले. आणि तिच्यासह तो रणांगणांवर येऊन उभा राहिला. परंतु अँटॉनीचे दैव फिरलेले दिसले. त्याची सुसज्ज जहाजे एकामागून एक अशी बुडू लागली. शत्रूचा जय सतत होत राहिला. अँटॉनीचे धैर्य खचूं लागले. परिस्थिती प्रतिकूल आहे असें पाहून क्लिओपात्रानें त्याला तसेंच सोडून दिले. ती आपल्या जहाजांतून सुरक्षितपणें राजवाड्यांत आली आणि मागोमाग अँटॉनीचे सारे शौर्य संपले व तोही अलेक्झांड्रिया लढाईचा प्रसंग सोडून प्रेमवीराच्या भूमिकेंत येऊन पोहोंचला.

या रणछोडदासाचे स्वागत आता कोण करणार ? सगळीकडे त्याची छीःथू झाली. क्लिओपात्रानें विजयी वीरांचे स्वागत आजवर केले होते ! तिला हा असला अँटॉनी मान्य नव्हता. साऱ्या जगावर स्वामित्व गाजविणारा, स्वतःच्या सौंदर्यावर नव्हे; असा प्रियकर तिला हवा होता. अँटॉनीसही सारी परिस्थिती उमगली. शत्रूच्या ताब्यांत त्याला सांपडावयाचे नव्हते; म्हणून त्यानें स्वतःचा घात करून घेतला ! विजयी रोमन वीर सर्व अलेक्झांड्रिया शहरांत धुमाकूळ घालीत राहिले. त्यांचा सेनापती ऑक्टोव्हियन शांत चित्तानें क्लिओपात्राच्या भेटीस आला. तो तिला रोमला न्यावयास तयार होता. परंतु सम्राज्ञी म्हणून ? पत्नी म्हणून ? नाहीं.

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

एक गुलाम म्हणून ! एक युद्ध कैदी म्हणून! विचारी क्लिओपात्रा ! रोमच्या राजशाही रस्त्यांतून मोठ्या मिरवणुकीनें सम्राज्ञी म्हणून मिरवणार होती; ती आज गुलाम म्हणून वागविली जात होती ! तिनें सारे कबूल केले.

आणि आपल्या सेविकेकडून सर्व प्रकारचा शृंगार करवून घेतला. सम्राज्ञीस शोभून दिसेल अशा प्रकारचा तिनें पोषाख केला; आणि एका नव्या 'प्रियकरास' भेटण्यास ती उत्सुक झाली. कैदेंत असूनही तिनें कुठून तरी फळांची एक करंडी मिळविली. त्यातच एक जहरी सर्प तिने मागविला होता. त्याचा एक दंश तिनें करवून घेतला; आणि मृत्यूच्या या भयानक चुंबनानंतर इजिप्तची सौंदर्यसम्राज्ञी हळूहळू निष्प्राण झाली ! क्लिओपात्रा ही अशी मरण पावली !

कुठे हे क्लिओपात्राचे भीषण जीवन-नाटच व कुठें मंगळवेढ्याच्या श्यामा नायकिणीच्या मुलीचे साधेसुधे जीवन ! श्यामा नर्तकीची मुलगी कान्होपात्रा सुरेख होती. तिच्या लावण्यानें सारेच वेडावून गेले होते. आईचाच व्यवसाय तिने केला असता तर तिला ते खचित शोभून दिसले असते. वयात आलेली, तारुण्यानें व नव्या नव्हाळीने मुसमुसणारी नृत्य संगीतांत तरबेज झालेली पोरगी प्रमुखांच्या नजरेंत यावी असेंच वाटणें तिच्या आईस स्वाभाविक होते. पंढरपूर फार प्रसिद्ध क्षेत्र. तेथून सात कोसावर मंगळवेढे गांव. यातीहीन असलेल्या चोखोबाने सर्वांत जवळीक पांडुरंगाची केली. तो येथलाच. दुष्काळांत धान्याच्या राशी प्रजेकडून लुटविणारे दामाजी पंत येथलेच. आणि याच भूमींत कान्होपात्रेसारखे सुगंधी पुष्प उमलत राहिले. त्याचा मधुर स्वाद, त्याचा रुपविलास, त्याचा मोहक रुवाब सर्वत्र पसरून राहिला. भोंवतीच्या भागांत तिच्या रूपविलासाची कीर्ती पसरत चालली !

ही वयात आलेली सुंदर व गुणवती पोर. उगाच कुणाच्या नजरेंत येऊन तिचे आयुष्य खराब होऊं नये म्हणून तिच्या आईनें पोक्तपणें सल्ला तिला दिला, "कान्हू! किती सुंदर दिसतेस माझ्या बाळे ! पण रुपाचे मातेरे करूं नकोस. [एखाद्या राजाच्या, सरदाराच्या घरी शोभशील ग पोरी. बादशहासुद्धां चटकन. . ."

पण कान्होपात्रा अति चतुर व धिटाईची मुलगी होती. तिनें आपल्या आईस स्पष्टपणें सांगितले, 'आई, तूं माझी काळजी नको करूस. मी रूपवान आहे ना ? मग माझ्यापेक्षां जो अधिक रुपवान असेल त्याच्याशीच मी एकनिष्ठ राहीन. असा कुणी दुनियेंत श्रेष्ठ पुरुष आहे ?'

विचाऱ्या आईस या प्रश्नाचे उत्तर माहित नव्हते. कान्होपात्रा या प्रश्नाच्या उत्तराच्या शोधांत होती. तिचे लक्ष आईच्या धंद्याकडे नव्हते. तिचे चित्त स्वतःच्या सौंदर्याकडे, यौवनाकडे नव्हते. जगांत अधिक सुंदर 'पुरुष' तिला शोधावयाचा होता. त्याच्याशीच ती नाते जडविणार होती. साऱ्या विश्वांत न सामावणारे सौंदर्य तिला हवे होते. साऱ्या सुखांना बाजूस सारणारे सुख तिला हवे होते. त्याच्यासाठी ती झुरत होती, त्याच्यासाठीं ती डोळे लावून बसली होती.

तोच एक चमत्कार घडला. 'विठ्ठल-रखुमाबाई, विठ्ठल रखुमाबाई' करीत एक भजनाची दिंडी मोठ्या तल्लीनतेनें पंढरपुरास निघाली होती. टाळमृदुंगांचा एकच घोष होत होता. विटेवर उभे असणाऱ्या


**बांधकाम योजना जलद साकार होण्यासाठीं...**







टोलेजंग इमारती, मोठे मोठे रस्ते,
कारखाने, धरणें, पूल व रेल्वे मार्ग...
जिकडे तिकडे बांधकामांची एकच प्रचंड धमाल
उडाली आहे. जागृत भारत प्रगतिपथावर
झपाट्यानें कूच करीत आहे...

...आणि या कामांत स्वस्तिक इंडस्ट्रियल
गम-बूटस् व रबरी हातमोजे कामगारांच्या हातापायांचे
इजा-अपघातांपासून उत्तम संरक्षण करून,
बांधकामें, अधिक प्रचंड, अधिक चांगली आणि
अधिक जलद व वेळीच पुरी होण्यास
हातभार लावीत आहेत.

स्वस्तिक
रबर प्रॉडक्टस् लि.
खडकी पुणे-३

इंडस्ट्रियल
गम-बूटस् व हातमोजे






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

'सुंदर ते ध्याना'चा एकसारखा ध्यास सर्व संतमंडळींना होता. भयभीत व उत्साहित होऊन कान्होपात्रानें आपल्या डोक्यावरून पदर घेतला व रस्त्यातच येऊन तिनें संतांचे चरण धरले. अश्रुपूर्ण नेत्रांनीं तिनें विचारले,

"मी येऊं तुमच्यावरोबर ? पांडुरंगास मी भेटू शकेन ? विठ्ठल माझा अंगिकार करील ?" एक नायकिणीची पोर हा प्रश्न विचारीत होती. आणि ज्ञानेश्वरांच्या भागवत संप्रदायानें साऱ्या जातींत विठ्ठलाचे प्रवेशद्वार खुले केले होते. 'ते पापयोनि मूढ । मूर्ख जैसे दगड । परि माझ्या ठाइं दृढ । सर्वभावें' जे होतील त्यांना मी जवळ करीन अशी भगवंतांची ग्वाही ज्ञानदेवांनीं साऱ्या जीवांना दिली होती. प्रेमसागरास मिळणाऱ्या साऱ्या ओघांना गंगेचे रूप येणार होते. खैर आणि चंदन अग्नीत एकाच रूपास मिळणार होती. चर्माचा तुकडा असो, सोन्याचा असो त्यावर राजाज्ञेची मुद्रा पडली की त्यांची किमत एक होणार होती. लोखंडास परिसाचा स्पर्श होणार होता. 'वालभाचेनि व्याजें' भेटणाऱ्या गोपी तरून गेल्या होत्या. तिथे नायकिणीच्या मुलीस कसली अडचण ? ती आधीच मनाने, शरीराने शुद्ध- अशुद्ध, अपवित्र, पापी, यांनासुद्धां जवळ करणारा श्रीविठ्ठल कान्होपात्रेस कां नाही मायेच्या पोटी सामावून घेणार ?

संतांच्या दिंडीवरोबर कान्होपात्रा पंढरपुरास निघाली. 'अवा चालली पंढरपुरा' या जातीची ही रूपवती मुलगी नव्हती. तिच्या नसानसांतून विठ्ठल प्रेम उफाळून आले होते. तोच एक ध्यास तिला होता. विटेवरचा सावळा घननीळ केव्हा पाहीन असे तिला झाले होते. अखेर श्रीविठ्ठलाचे दर्शन तिला झाले. साऱ्या जगांतील सुंदर पुरुष तिला भेटला. तिच्या मनास अलौकिक आनंद झाला. 'अनंत लावण्याची शोभा, तो हा विटेवरी उभा' म्हणून जनाबाईने ज्याचे वर्णन केले त्याच दर्शनाने कान्होपात्रा कृतकृत्य झाली. 'रूपसावळे सुंदर । कानी कुंडले मकराकार' पाहून तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा झरत राहिल्या. 'रूप पाहता लोचनीं । सुख जाले वो साजणी' म्हणून ज्ञानेश्वर का सुखावतात हे तिच्या ध्यानांत आले. स्वतःपेक्षा परमसुंदर असा श्रेष्ठ 'पुरुष' तिला चंद्रभागेच्या वाळवंटांत भेटल्यावर ती परत मंगळवेढ्यास गेलीच नाही.

पंढरपुरासच राहून तिने विठ्ठलाची सेवा केली. आपले सर्वस्व विठ्ठलास कान्होपात्रेने अर्पण केले. पांडुरंगाच्या भजन पूजनांत ती दंग झाली. दिव्यत्वाच्या स्पर्शाने तिला कवित्व स्फुरत राहिले. 'माझे माहेर पंढरी । सुखे नांदु भीमातीरी । येथे आहे मायबाप हरे ताप दरशने । निवारिली तळमळ चिंता । गेली व्यथा अंतरीची । कैशी विटेवरी शोभली । पाहूनि कान्होपात्रा धाली' असा स्वानुभव ती आता कवितेत, अभंगांतून प्रकट करूं लागली. संत सहवासात व विठ्ठलाच्या सान्निध्यांत तिच्या व्यक्तित्वांत अर्थपूर्ण विकास होत राहिला. तिच्या वाणीस भक्तीच्या माधुर्याचा सुगंध येत राहिला.

'माझ्या जीवीचे जीवन ।
तो विठ्ठल निधान ।।
उभा असे विटेवरी ।
वाटी प्रेमाची सिदोरी ।।
आलीयाचा धनी ।
निवारीतो चक्रपाणी ।।
भेटा दयेच्या सागरा ।
विनवितसे कान्होपात्रा ।।

या सारख्या भक्तीच्या आर्त उद्‌गारांनी तिचे जीवन फुलत राहिले. जन्मजन्मांची सुकृते फळांस आली म्हणून विठ्ठलाचे


# तुमच्या ग्रंथागाराचें वैभव ठरतील अशीं

दलाल आर्ट स्टुडिओचीं

## ३ अभिमानास्पद प्रकाशनें

**चित्रांजली**
१२ रंगीत चित्रें, मराठींतील प्रथितयश लेखकांनीं त्यावर केलेलें भाष्य; व अनेक दुर्मिळ रेखाचित्रें. क. ७।। रु. + र. पो. खर्च निराळा.

**भारताचे भाग्य विधाते**
१४ रंगीत चित्रें, संशोधनपूर्वक केलेलें जीवनभाष्य व अनेक दुर्मिळ रेखाचित्रें, किं. ७।। रु. + र. पो. खर्च निराळा.

**अमृतमेघ**
११ रंगदार कलाकृति व ११ रंगीत रेखाचित्रें. भारतांतील बारा महाकवींची अद्‌भुतरम्य अशी सचित्र ओळख किं. ६ रु. + र. पो. खर्च निराळा.

*'दीपावली'च्या वर्गणीदारांना पहिली दोन पुस्तकें प्रत्येकीं रु. ५ मध्यें व 'अमृतमेघ' रु. ४ मध्यें मिळेल. त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ भरणारांना यांपैकीं एक पुस्तक सप्रेम भेट देण्यांत येईल.*

एकमेव विक्रेते—**अ. अं. कुलकर्णी,**
कॉन्टिनेन्टल प्रकाशन, टिळक रोड, **पुणें-२.**

**दीपावलीचे आजच वर्गणीदार व्हा !**


अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

पाय दिसले, डोळ्यांचे सार्थक झाले असा भाव तिच्या मनांत निरंतर उमटत राहिला. आपल्या जन्माचे सार्थक या सौंदर्यसंपन्न तरुण मुलीने विठ्ठलसेवेत मानिले.

परंतु येथेही थोडा विघाड झालाच. विठ्ठलाशी पूर्णपणे समरस होण्याचा प्रसंग एकदा अचानक उद्भवला. कान्होपात्रेच्या सौंदर्याची कीर्ती अजूनही भोवती पसरून होती. तिची अभिलाषा धरणारे काही होतेच बिदरच्या बादशहाच्या कानावर तिच्या रूपलावण्याची वार्ता गेली. बादशहा पागल झाला. त्याने लगेच आपले शिपाई कान्होपात्रेस आणण्यासाठी पाठविले. विठ्ठलाच्या एकनिष्ठ भक्तावर हे एक प्राणसंकटच होते. कान्होपात्रेस ही हकीगत समजताच ती क्षणभर चमकली. परंतु सर्वरक्षक श्रीविठ्ठल असल्याची खात्री तिला त्याचवेळीं वाटली. दाराशी बादशहाचे शिपाई उभे राहिले आहेत; बिदरला चलण्यासाठी आग्रह करीत आहेत, अशा अवस्थेत 'थांबा, मी विठ्ठलाचा निरोप घेऊन येते.' म्हणून कान्होपात्रा घरांतून बाहेर पडून मंदिरांत आली.

डोळे भरून तिने विठ्ठलाकडे पाहिले. आलेल्या संकटाची चाहूल जणु विठ्ठलाच्या डोळ्यांतहि तिला दिसली. तिला आता जगणेहि अशक्य झाले. तिने विठ्ठलचरणांशी मिठी मारून आर्ततेने उद्गार काढले–

"पुरविली पाठ न सोडी खळ।
अधम चांडाळ पापराशी ।।
वारिता नायके दुष्ट दुराचार।
काय करूं विचार पांडुरंगे ?"
'तूं माय माउली जगाची जननी।
म्हणवोनी मिठी चरणीं घालीतसे ।।
विनवी कान्होपात्रा जोडोनिया हात।
आता देह अंतसमय आला ।।'

तिनें मोठ्या कनवाळुपणें विठ्ठलास विनवणी केली, 'विठ्ठला, आता अंत पाहू नकोस रे. आता तुझ्याशिवाय दुसरे कुणी नाहीं. सर्वांची संकटे तू निवारण केलीस. मीच काय अशी दूर राहिले ? विठ्ठला, पांडुरंगा ! तुला कणव येत नाहीं असें तरी कसे म्हणू रे ? पण आता धीर धरवत नाहीं. दुष्टांचा स्पर्श होण्याच्या आधींच पांडुरंगा, तुझ्या रूपांत मला सामावून घे. या आघाताचे निवारण आतां तूच कर. तुझी लाज आता तूच सांभाळ. मी आता विनवणी तरी किती करावी रे ?...

"नको देवराया, अंत पाहूं आता।
प्राण हा सर्वथा फुटों पाहे ।।
हरिणीचे पाडस व्याघ्रें धरियेलें।
मजलागीं जाहलें तैसें देवा ।।
तुजवीण ठाव न दिसे त्रिभुवनीं।
धांवे वो जननी विठाबाई ।।
मोकलोनी आस जाहले मी उदास।
घेई कान्होपात्रेस हृदयांत ।।"

कान्होपात्रेचा हा करुण पुकार पांडुरंगानें ऐकला ! त्याच्या चरणांवर तिची जी मिठी होती ती जबरदस्तीनें सोडवावी लागली. पांडुरंगाच्या चरणांवर तिनें जे एकदा डोळे ठेविले ते पुनः वर उचललेच नाहीं. श्यामा नायकिणीची ही पोर पांडुरंगाच्या रूपांत सामावली गेली. या साध्वीची समाधी देवालयाच्या दक्षिणद्वारी आहे. तेथला तरटीचा वृक्ष अजूनही तिच्या आर्त पुकारांस व कृतार्थ जीवनास स्वानंदानें डोल देत असतो !

असा हा कान्होपात्रेचा शेवट ! तसा तो क्लिओपात्रेचा शेवट ! दोघींत साम्य फारच थोडे. तुलना करण्याइतपतही समानता नाहीं. परंतु एकाच स्त्रीत्वाचे धागे किती वेगवेगळ्या दिशांनीं गुंफले जातात हे ध्यानांत घेण्यासारखे आहे. क्लिओपात्रा ही प्रसन्न सौंदर्याची देवता तर कान्होपात्रा ही सोज्वळ भक्तीची प्रतिमा होय. पहिलीवर शेक्सपीअर, शॉसारख्या बड्या नाटककारांनीं आपल्या कलाकृती उभ्या केल्या. चित्रपट सजविले गेले. दुसरीवरही मर्यादित क्षेत्रापुरते कां होईना पण साहित्य संस्कार झाले आहेत. परंतु या दोन स्त्रियांची जात निराळीच मानावी लागेल. प्रमत्त प्रेम, विलक्षण महत्त्वाकांक्षा, दुर्दम्य इच्छाशक्ती, जहरी सौंदर्यलालसा, सुबक कलाविलास इत्यादि गुणांचे एक विलक्षण दर्शन हाही ईश्वरी लहरीचाच एक आविष्कार मानून सावधतेनें कांहीं नाते दोघींत शोधल्यास सापडेल. नाहीं असें नाहीं. परंतु येथून पुढचा सूक्ष्म, तरल व नाजुक प्रान्त कोण निरखून पहाणार ? स्थूल दृष्टीस मात्र वरवरचा फरक स्पष्ट जाणवणारा आहे.

● ● ●

किर्लोस्कर

किर्लोस्कर ऑईल एन्जिन्स लिमिटेड,
रजिस्टर्ड ऑफिस—एलफिन्स्टन रोड, पुणे ३.

मुदतीच्या ठेवी
स्वीकारणे आहेत.

विशेष माहिती व अर्जांचे फॉर्म्ससाठी :—
आपल्या नजिकच्या स्टॉक एक्स्चेंजमधील अधिकृत स्टॉक ब्रोकर्सना लिहा.
—किंवा कंपनीचें रजिस्टर्ड ऑफिसला लिहा.

| मुदत | वार्षिक व्याजाचा दर १ ऑगस्ट १९६५ पासून अंमलात |
|---|---|
| १ वर्ष | ७ टक्के |
| २ वर्षे | ७½ टक्के |
| ३ वर्षे | ८ टक्के |
| ५ वर्षे | ८½ टक्के |

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




— आनन्द रेगे



**अगदीं अळणी, बाळबोध जिणं जगणाऱ्या दसुकाकांना सुधाकाकूंनीं आग्रह करून पंधरा दिवसांची रजा घ्यायला लावली. त्या खूप भटकल्या. साऱ्यांना भेटून आल्या. सारा मांड व्यवस्थित मांडला. कां ? कशासाठीं ? ....**

**सुधाकाकू** आकस्मिकपणं काल रात्रीं मरण पावल्या. सकाळीं त्या चांगल्या वावरत होत्या. बोलत होत्या. दुपारीं तर शेजारीं जाऊन त्या बसल्या होत्या व खूप इकडच्या तिकडच्या गप्पा करीत होत्या. कुणालाच वाटलं नव्हतं कीं, ही बाई रात्रीं एकाएकीं शेजाऱ्यापाजाऱ्यांतून कायमची निघून जाईल. सुधाकाकूंची प्रकृति चांगली. त्या स्थूल नाहीत कीं, हडकुळ्या नाहींत. तशी कांहीं त्यांच्या प्रकृतीची कधीं तक्रार नसायची. कुठं सर्दी पडसं झालं तरच. डोकेदुखीची मात्र त्यांची व्याधी खूप जुनी. मग रात्रीं जेवणखाण आटपलं, बिछानें घातले. मुलं झोपलीं कीं, त्या बाम डोक्याला चोळत व झोपत. एकदां दसुकाका म्हणाले, 'काय उग्र वास येतो हा ! झोंपहि लागत नाहीं या वासानं. हें सुधाकाकूंनीं ऐकलं. आणि मग न चुकतां बाम लावण्यापूर्वी त्या दसुकाका झोंपले कीं नाहीं तें बघत. ते झोपलेले असले तरच त्या बाम चोळत. उगीच कशाला त्रास आपल्यापासून दुसऱ्यांना, असं त्यांना वाटे. बाईचा कधींच दुसऱ्या कुणाला त्रास नसे. मुलांवरून कधीं कधीं शेजारच्या वत्सलाबाई त्यांच्यावर चवताळून उठत. म्हणत कशा, "डुकरांच्या पोरांसारखीं मुलं झालीं आहेत. आपणांला संभाळतां येत नाहींत तर भानगडींत कशाला पडायचं माणसानं ? टोपल्यांखालीं कोंबडया झांकून ठेवतात. तसं ठेवा म्हणावं पोरांना झांकून. दुसऱ्यांच्या दारावर नको भिकाऱ्यासारखी." वत्सलाबाई कांहींशा आधुनिक, ठाकठीक, नीटनेटक्या. त्यांना ओंगळपणा बिलकुल खपायचा नाहीं. सुधाकाकूंना मुलं खूप. खूप म्हणजे सात. शेवटचीं दोन जुळीं. जुळीं व दोघांनाहि समज कमी. कुणाच्याहि घरांत जायचं. थेट स्वयंपाकघरापर्यंत. कशांत तरी हात घालायचा, अशी त्यांची संवय. हे जुळे मुलगे दिसायलाहि ओंगळ. त्यांच्या हनुवटीवर खालच्या ओठांतून सारखी झिरपत असलेली लाळ सुकलेली. त्यामुळें त्यांच्याकडे बघणंहि किळसवाणं.

वत्सलाबाईंचं हें बोलणं सुधाकाकूंना नाहीं खपायचं. त्यांचे ते शब्द ऐकून त्या शरमिंद्या होत. अशा कशा बोलतात या ? कुणीं ऐकलं तर कोण काय म्हणतील ? पण त्यांच्याबरोबर भांडायला मात्र त्या जात नसत. त्यांना राग येई. रागाच्या भरांत त्या जुळ्या मुलांना दबादब मारत. पण मग मात्र त्या अस्वस्थ होत. कशावरच त्यांचं लक्ष नसायचं. रात्र झाली. तीं मुलं झोपलीं कीं, त्यांच्या उशाशीं त्या बसत व एकटयाच कुणीं बघूं नये



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अशा तऱ्हेनं रडत. स्वत:शींच म्हणत, 'या दोघांचं कसं काय होणार पुढं ? आमच्या-नंतर यांना बघणार कोण ?

आणि मग दसुकाकांचा त्यांना राग येई. राग अशासाठीं कीं, वय जवळजवळ पंचेचाळीशी नुकतीच उलटलेली. आणि मुलांचा हा व्याप असा वाढलेला. बाकीच्या बिऱ्हाडी कशी तीनचार मुलं होतीं. ह्यांना सांगायचं कुणीं. त्यांना ती रात्र आठवली. रात्रींचे दोन वाजून गेले होते. त्या स्वस्थ झोंपल्या होत्या. इतक्यांत त्यांना स्पर्श जाणवला. त्या चटकन् जाग्या झाल्या. व आगपेटी बघूं लागल्या. पण तितक्यांत घोगरा आवाज त्यांच्या कानावर आला. "मी तो."

"हें काय या वयांत ?"

"काय झालं त्याच्यांत ?"

"उद्यां मूल झालं तर मला तोंड काढायला नको - बाहेर."

"कां ? लग्नांनंतर मुलं झाली तर काय होतं ? लोकांचं काय सरतं ?"

असं म्हणतच दसुकाका त्यांना बिलगले. व मुक्या कोंकरासारख्या त्या दसुकाकांच्या आहारी गेल्या.

दसुकाकांचं वागणंच असं घसमुसळे-पणाचं. त्यांनीं सुधाकाकूंना काय हवं, काय नको याची कधीं विचारपूस केली नाहीं. वं करावीशीहि वाटली नाहीं. पण सुधाकाकूंनीं कधीं ब्र नाहीं काढला. त्या एकसारख्या घरांत राबत असायच्या. सकाळ, दुपार, संध्याकाळ, कधीं नवरा-बायकोचं मोकळं मोकळं बोलणं कुणीं ऐकलंच नाहीं. किंवा त्यांना मोकळेपणीं हसतांनाहि कुणीं बघितलं नाहीं. वत्सला-बाईचा संसार पाहून त्यांना समाधान व्हायचं. वत्सलाबाई नवी साडी नेसायच्या व तिचा नवरा बूलन पँट घालायचा. आणि दोघंहि कधीं सिनेमाला किंवा कधीं जुहूवर जायला बाहेर पडायचीं. तेव्हां गॅलरींत कठड्याला रेलून सुधाकाकू त्या स्वच्छंदी जोडप्याकडे डोळे भरून बघत रहायच्या. आणि मग त्यांना दसु-काकांचं वागणं आठवायचं. त्यांना वाटा-यचं, हे जर वत्सलाबाईच्या नवऱ्या-सारखे चांगले मोकळेपणानें वागतील तर ? पगार जास्त नसला तरी चालेल. मी उपशीन सगळ्या हालअपेष्टा ! पण वागणं असं मोकळं मोकळं असलं कीं, श्रमाचं कांहीं नाहीं वाटायचं.

दसुकाका तसे स्वभावानें चांगले. मनानं सरळ. कसलं कपट म्हणून त्यांच्या मनांत ठरायचं नाहीं. पण त्यांना कसली म्हणून हौस नव्हतीच. आवड अशी नव्हतीच. सकाळीं नोकरीवर जायचं, संध्याकाळीं यायचं. ठरलेल्या चाकोरीं-तून सरपटत्या चालीनं चालायचं. सकाळीं 'नवशक्ति'च्या पानांतून जो काय जगाशीं त्यांचा संबंध येत असे तेवढाच.

दसुकाका घरांत फारसे बोलत नसत. मुलांशीं नाहीं किंवा सुधाकाकूंशींहि नाहीं. त्यांत बोलायचं तें काय ? चाललं आहे ना रोजच्यासारखं ! त्यांत बोलण्याला मुळीं वावच कुठें असतो ? महिन्याकाठीं पगार आणायचा. व संसार चालवायचा. सुधाकाकूंनीं संसाराचीं घडी ठाकठीक बसवलेली. दसुकाकांना विशेष कांहीं बघावं लागतच नसे मुळीं.

सुधाकाकू मात्र कमालीच्या हौशी. जशी कांहीं एकादीं आधुनिक मुलगी असावी तशा. नवरात्र सुरू झाली कीं, दारापुढं त्यांनीं काढलेल्या रांगोळ्या नुसत्या बघत रहाव्यात. गणेश चतुर्थीच्या वेळीं गणपतीच्या भंवतालची जी आरास त्या रचत असत त्यामुळं त्यांची कलात्मक सौंदर्यदृष्टि प्रतीत होई. ती शिकली मात्र नव्हती हो. त्यावेळीं शिक्षण मुलींना काय होय !

सगळं कांहीं असं सुरळीत चाललं होतं. जसं इतकीं वर्षं चाललं होतं तसं. ठर-लेल्या चाकोरीनं. ठरलेल्या पद्धतीनं.

त्या दिवशीं सुधाकाकू उठल्या व दसु-काकांना म्हणल्या,

"तुम्हीं रजा काढा पंधरा दिवस." दसुकाकांना तें ऐकून आश्चर्य वाटलं. वीस वर्षांच्या नोकरींत सुधाकाकूंनीं त्यांना कधीं रजा घ्यायला सांगितलंच नव्हतं. अडीअडचणी तशा खूप आल्या होत्या. मुलांचा आजार यायचा. स्वत:ला त्यांना बरं नसायचं. पण त्या कशाबशा संभा-ळून घेत. तीन वर्षांपूर्वी थोरला मुलगा आजारी होता. तर सुधाकाकूंनींच सगळं तें आजारपण काढलं होतं. दसुकाकांची रजा फुकट जात होती. पण रजा घेऊन करणार काय ? घरीं बसून येतो कंटाळा. आणि म्हणूनच त्या दिवशीं सुधाकाकूंनीं रजा काढायला सांगितली तेव्हां त्यांना आश्चर्य वाटलं. त्यांनीं म्हटलं "कां ?" त्यावर सुधाकाकू उत्तरल्या,

"मला वाटतं, तुम्हीं घरींच रहावं. तुम्हांला विश्रांति तरी तशी कुठें आहे ? सकाळ-संध्याकाळ आपलं ऑफिसचं काम."

**चक्कर**

**असे शामले तव मानेवरती**
**रुळणारे ते सुंदर चक्कर...**
**वळणावरती तुझ्या मागुती**
**फिरे मुशाफीर होऊन चक्कर...**

• • •

**आमचे 'हे'**

**थंडीत यांच्या डोक्यावर**
**ओतले गार पाणी बाई...**
**तेव्हांपासून आमचे 'हे'**
**झाले आहेत गवई...**

• • •

**नारद....**

**नारदाच्या 'पार्टी'चो**
**तऱ्हा भलती न्यारी...**
**शेंडी वेडा विसरतो**
**हिरव्या माडीवरी...**

• • •

**दोन वाघ**

**नांवाचाच एक वाघ**
**शेळीलाहि घाबरतो**
**ऑफिसांतला दुसरा—**
**—वाघ, घरीं शेळी होतो...**

• • •

**निराशा**

**'ज्ञानदेवा'साठीं——**
**संन्यास मी स्वीकारला**
**पण 'रुक्मिणीनें' मला**
**घटस्फोट दिला...**

**- प्रा. वि. द. संत**








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"ऑफिस काय किंवा घर काय सारखंच तें."

"तसं नव्हे. मला आपलं असं वाटतंय् कीं, तुम्हीं आपलं घरीं राहावं. मग संध्या-काळीं किंवा सकाळींच आपण दोघांनीं बाहेर जावं."

सुधाकाकू कधीं बोलल्या नव्हत्या तशा आज बोलत होत्या. दसुकाकांना ते शब्द नवीन होते. अनोळखी होते. ते त्यांच्याकडे नुसते पहात राहिले. सुधाकाकू बोलतच होत्या. "नाहींतरी आपल्याला वेळ कुठं असतो ? तुम्हीं आणि मीं तशीं कधीं एकत्र आलोंच नाहीं. कधीं मोकळेपणीं बोललोंच नाहीं. कुठं हिंडलो फिरलों नाहीं. कधीं नात्यागोत्याकडे जायचं झालं तर मी एकटंच जायचं. आतां कसे घरीं बसा थोडे दिवस. आपण दोघं मिळून एकत्र हिंडू, फिरूं."

सुधाकाकू बोलत होत्या. कोंडल्या गेलेल्या त्यांच्या मनाचा बंधारा जसा कांहीं फुटला होता. जशा कांहीं त्या पंधरावीस वर्षांनीं तरुण झाल्या होत्या. कोमेजून गेलेली वेल जणुं कांहीं बहरली होती. हिरवीं हिरवीं पानं सळसळत होतीं. मन कसं ताजंतवानं झालं होतं.

दसुकाकांबरोबर त्या अशा एवढ्या मोकळेपणीं कधींच बोलल्या नव्हत्या. बोलावं असं त्यांना वाटे, पण बोलून बोलणार काय असंहि होई. तसं बोलण्या-सारखं काय घडत होतं ? बाजारभाव स्थिर होते. घरांतहि कुणाचा आजार नव्हता. सारं सुरळीत चाललं होतं. मग बोलायचं काय ? . . . पण शेजारच्या वत्सलाबाई आपल्या मिस्टरबरोबर गप्पा मारत होत्या. पलीकडच्या प्रधानांची कुजबूज नेहमींच कानावर पडत होती. समोरच्या गॅलरीच्या कठड्यावर कबू-तरांची जोडी चोंचींत चोंच घालून कुऽऽऽ कुऽऽऽहू करीत होतीं. कांहीं घडत नव्हतं. तरीपण गप्पा रंगत होत्या. शब्दांचा ओघ वहातच होता. हंसणं कसं खळखळत होतं . . .

. . . संसारवृक्ष फोंफावत होता. सुखदुःखांचीं वाघुळं ह्या फांद्याफांद्यांवर फडफडत होतीं. या वृक्षांच्या डेहळ्यांतून अपेक्षांचीं, इच्छांचीं, स्वप्नांचीं घरटीं बांधलीं गेलीं होतीं. सुधाकाकू आतां त्रयस्थाच्या नजरेनं हा वृक्ष पहात होत्या. त्यांना तीं घरटीं दिसत होतीं. त्यांना वाटत होतं, मोठं वादळ आलं तर ही घरटीं उध्वस्त तर होणार नाहींत ? त्यांच्या मनांत भय शिरलं.

त्यांना वाटूं लागलं दसुकाकांना हीं घरटीं दाखवावीं. तीं सुखदुःखाचीं फड-फडणारीं वाघुळं दाखवावीं. या वृक्षाचा पसारा दाखवावा. त्याचीं इतस्तत पसरलेलीं पाळंमुळं दाखवावीं....जो रस्ता आपण चालून आलो त्याचा प्रवास कसा काय झाला, तें बोलावं. त्यांना खूप खूप सांगण्याची इच्छा त्यांच्या मनांत फस-फसून आली. आणि तसं त्यांना आतांच कां वाटूं लागलं कोण जाणे ! पण त्यांच्या मनानं मात्र घेतलं होतं कीं, दसुकाकांबरोबर एकसारखं बोलत रहावं

दसुकाकांना सारं हें चकीत करून सोडणारं होतं. सुधाकाकूंना झालं आहे तरी काय ? रजा घ्यायला लावण्याचा त्यांचा हा आग्रह पहिलाच होता आणि म्हणूनच त्यांना तो मोडवला नाहीं. त्यांनीं पंधरा दिवसांची रजा मंजूर करून घेतली.

सुधाकाकूंना आनंद झाला. जणुं कांहीं दसुकाका आतां तिच्याच मालकीचे झाले होते. दुसऱ्या दिवशीं मुलं शाळेंत गेलीं. त्यांना मोकळें वाटलं. घरांत फक्त त्या नि दसुकाका. त्या दसुकाकांना म्हणाल्या, "आज संध्याकाळीं आपण चौपाटीवर जाऊं या. आणि तिथून थोरल्या दीराकडे जाऊं. तिकडेच जेवण घेऊं. घरांत सगळं केलेलं आहे. भात फक्त करायचा आहे तेवढा शान्ता करील व मुलांना जेवायला वाढील." सुधाकाकूंच्या शब्दांबाहेर दसु-काका जातच नव्हते.

संध्याकाळीं त्या चौपाटीवरच्या वाळूंत बसल्या. रजेचा दिवस नव्हता. त्यामुळं वाळूवर गर्दी नव्हती. समुद्राच्या भरतीच्या लाटा घुसळत येत होत्या. वाळू भिजून निघत होती व लाटा मागं जात होत्या. सुधाकाकूंना वाटलं कसल्यातरी अनामिक भावनेची एक जोरदार लाट आपल्या मनांत व्यापून राहिली आहे. त्यांनीं सभोंव-तालीं पाहिलं. वाळूवर कुजबुजत कांहीं जोडपीं बसलीं होतीं. दुरवर होड्या हेलकावे खात होत्या. त्या म्हणाल्या,


# मराठा गडी (अप)यशाचा धनी

लेख वाचले, चर्चा केल्या, परिषदा गाजल्या,
वाचकांनीहि 'पेपर' सजवले. तरी

## "महाराष्ट्र मागें कां ?"

ह्या प्रश्नाचें उत्तर मिळालेसें दिसत नाहीं

## आतां ऐका आमची स(व्यंग) चित्र कैफियत

**पण त्यासाठीं 'दीपावली' चा यंदाचा दिवाळी अंक**
**वाचला (व संग्रहीं ठेवला) पाहिजे !!**


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका







# लाइफबॉय
## ज्याचे घरीं
## आरोग्य तेथें वास करी

लाइफबॉयनें स्नान करतांच उत्साह, चैतन्याचं वारंच जणूं अंगांत उसळूं लागतं. त्या आरोग्यपूर्ण प्रसन्नतेनंच कळून येतं कीं लाइफबॉयमध्यें उत्तम साबणाचे सर्व गुण तर आहेतच, शिवाय आणखीहि विशेष गुण त्यांत आहेत.

**लाइफबॉय मळघाणींतील जंतू धुवून टाकतो**

हिंदुस्तान लीव्हरचें उत्पादन

लिंटास-L 49-140 MA









अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"वरं वाटलं. नाहीं ?" जणूं त्या फार दिवसांनीं आपल्या जुन्या मित्राला भेटत होत्या.

दसुकाकांनाहि मोकळ्या वाऱ्यांत हायसं वाटलं. त्यांचं मन सुखावलं. सुधाकाकू बोलूं लागल्या, "आम्हीं रत्नागिरींत लहानपणीं होतों तेव्हां आजोबा आम्हांला समुद्रावर न्यायचे. आम्हीं ओल्या वाळूंत घरटी बांधत असूं. अशीच मजा येई तेव्हां. अशीच एक लाट यायची व घरटं मोडून जायची...आतां ती मजा गेली व माणसंहि कुठं गेलीं पत्ता नाहीं."

सुधाकाकूंचं मन जुन्या आठवणींनीं वहरून आलं. त्या नुसत्या बोलत होत्या. दसुकाका ऐकत होते कीं, नव्हते याचीहि त्यांना खंत नव्हती. कांहींशा त्या स्वतःशींच बोलत होत्या. त्या समोरच्या समुद्राशीं, त्या वाळूशीं, त्या लाटाशीं त्या संलग्न झाल्या होत्या. त्यांचाच एक भाग झाल्या होत्या. त्यांच्याशींच त्या बोलत होत्या.

सूर्यास्त होत आला तशा त्या उठल्या व नाना चौकांत थोरल्या दीराच्या घरीं आल्या. कधीं जोडप्यानं न येणारे दसुकाका आले तरी कसे यावेळीं ? रजाहि नव्हती सगळ्यांनाच. हें दसुकाकांचं येणं आश्चर्याचं होतं. मग दसुकाकाच म्हणाले, "हीच आज कांहीं दिवस मागं लागली. सगळ्यांना भेटून येऊं. रजा घ्या. रजा भरपूर होती. घेतली मी रजा. आता रोज एकेकाला भेटायचं असं ठरलंय्. जशी कांहीं ही मुंबई सोडूनच चाललीय्."

सुधाकाकू हंसल्या. त्यांना समाधान वाटलं, दसुकाकांच्या बोलण्यानं. त्यांनीं कांहींच आढेवेढे न घेतां आपलं ऐकलं. दसुकाका त्यांचं सारं ऐकत होते. त्या त्यांना सारं कांहीं समजावून देत होत्या. मुलांचं शिक्षण व्हायचं होतं. शान्ता मॅट्रिकला होती. नंतर तिला नोकरीला लावल्याशिवाय गत्यंतर नव्हतं. व मग तिचं लग्न. नवरा कसा चांगला हवा होता. शिकलेला. चांगला पगार असलेला. धाकटचा जुळचा मुलांची जबाबदारी फार मोठी होती. त्यांना समज कमी होता. सुधाकाकू, दसुकाकांना जबाबदारी पटवून देत होत्या. ते सारं कांहीं समजावून घेत होते. पण त्यांना हरघडी नवल वाटत होतं कीं, सुधाकाकू अशा एकाएकीं कां बोलत आहेत ? असा त्यांचा सूर कां ? जशा कांहीं त्या संसारांतून निवृत्त होणार होत्या.

गेले दहा दिवस प्रत्येक जवळच्या नातेवाईकांकडे त्यांच्या भेटी होत होत्या. थोरली नणंद, जाऊ, काकी, मावशी कोण म्हटल्या कुणीच उरलं नव्हतं. सुधाकाकूंना समाधान होत होतं. आपल्या जवळच्या माणसांच्या भेटीचा आनंद त्या मनमुराद लुटत होत्या. त्यांच्याशीं मोकळेपणीं गप्पा करीत होत्या. आतां फक्त मरोळला मामांकडे जायचं होतं. जेवणखाण आटोपलं, शेजारीं चांगल्या त्या बसून आल्या. बोलून आल्या व मग दसुकाकांना म्हणाल्या,

"आज मामांकडे जाऊं या मरोळला."

"उन वघ कसं पडलंय्. संध्याकाळीं जाऊं. नाहींतर त्रास होईल तुला."

"होऊं दे त्रास. आत्तांच जाऊं या."

त्यांनीं हट्टच धरला. व तीं दोघंहि मरोळला निघालीं. आज मात्र सुधाकाकू नेहमींसारख्या बोलत नव्हत्या. कांहींतरी हरवल्यासारख्या त्या वागत होत्या. दसुकाकांना त्यांच्या वागणुकीचा अर्थच कळत नव्हता. आतांच्या त्यांच्या अबोलपणाचं रहस्य त्यांना कळतच नव्हतं.

मरोळहून येतांना मात्र त्या एकदम बोलायला लागल्या. जसं कांहीं कांहींतरी सांगायचं त्यांचं राहून गेलं होतं. त्या बोलत होत्या.

"यंदा गणपति आमच्याकडे असेल. बाहेरच्या खोलीला ऑईलपेंट काढून घ्यायला हवा. व त्या दिवशीं मी समई घेतली ना तीच लावायची वरं का. यंदा गणपतिभंवतीं नवी आरास करायची. मी तें त्या दिवशीं मखर आणून ठेवलंय्. लाइटची माळ आणलीय्. असं शोभिवंत दिसलं पाहिजे. अन् माझी एक इच्छा आहे. गीतरामायणाचा या वर्षी कार्यक्रम ठेवायचा. आपला तो मावसभाऊ रेडीओवर गातो ना. गोड आवाज आहे. मी त्याला बोलून ठेवलंय्. मला तें ऐकावसं वाटतं. एका स्त्रीच्या संसाराची ती कथा—त्याची गोडीच अवीट...ठेवायचा हा प्रोग्रॅम हं..."

सुधाकाकू भरभर बोलत होत्या. जणू कांहीं त्यांना खूप बोलायचं होतं. संपवायचं होतं. मनांत भरून आलं होतं. व तें मन त्या ओतत होत्या. भरभरून


अहो हे काय ? तुम्ही माझा हात दाबतां....



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

ओतत होत्या. अशी त्यांना संधि पुनः मिळणार नव्हती. अशी वेळ येणार नव्हती. दसुकाका नुसते ऐकत होते.

त्या घरीं आल्या तेव्हां रात्र झाली होती. शान्तानं जेवण करून वाढलं होतं. मुलं झोंपलीं होतीं. शान्ताच जागी होती. दसुकाका लगेच विछान्यावर पडले. ते दमून गेले होते. विछान्याला अंग टेकतांच त्यांना झोंप लागली. अभ्यास करीत असतांनाच शान्ताचेहि डोळे मिटले. सुधाकाकूंना मात्र झोंप येईना. त्या उठल्या. त्यांचं डोकं ठणकूं लागलं. त्यांनीं वाम चोळला. डोकं थांबेनाच. त्यांना 'मरगळल्यासारखंहि वाटूं लागलं. घेरी आल्यासारखं वाटूं लागलं त्यांना वाटलं. दसुकाकांना उठवायचं. त्या त्यांच्या बिछान्याकडे आल्या. ते दमून स्वस्थ झोंपले होते. त्यांना त्रास द्यायला त्यांच्या जीवावर आलं. त्या पुनः आपल्या विछान्यावर टेकल्या. पण डोक्यांत घण वसूं लागले. त्या तळमळूं लागल्या. त्या उठल्या. व दसुकाकांना त्यांनीं जागं केलं.

"काय होतंय् ?" दसुकाका म्हणाले.

"काहींतरींच होतंय्. डोकं दुखतंय्. उभंहि राहतां येत नाहीं." असं म्हणतच त्या खालीं कोसळल्या. दसुकाकांनीं त्यांचा नाकाला कांदा लावला. त्या शुद्धीवर आल्या व कशाबशा बोलल्या.

"डॉक्टरला बोलवा. मला सहन नाहीं होत."

दसुकाका बाहेर पडले व लगेच डॉक्टरला आणलं. डॉक्टरनीं सुधाकाकूंना नीट तपासलं व ते गंभीरपणें म्हणाले,

"आत्तां हॉस्पिटलमध्यें न्या यांना."

"आत्तां ?" दसुकाकांचे पाय लटपटूं लागले.

"हो. ब्रेन-हॅमोरेजची केस आहे. वेळ घालवण्यांत अर्थ नाहीं." लगेच टॅक्सी आणली. दसुकाका सुधाकाकूंना घेऊन हॉस्पिटलमध्यें पोंचले. दुसऱ्या वर्गाच्या खोलींत एका कॉटवर सुधाकाकूंना झोंपवलं. सुधाकाकूंनीं दसुकाकांना जवळ बोलावलं. त्यांचे ओठ हलूं लागले. पण शब्द मात्र बाहेर पडत नव्हते. त्या मग स्वस्थ पडून राहिल्या. बोलत नव्हत्या. हंसत नव्हत्या. फक्त त्यांच्या श्वासोच्छ्वास होत होता. मंद-मंद.

दसुकाका डॉक्टरची वाट बघत होते. अखेर डॉक्टर आले. पण त्यांचे उपचार सुरू होण्यापूर्वींच सुधाकाकूंनीं अखेरचा श्वास सोडला.

दसुकाका ताठरलेल्या डोळ्यांनीं त्या अचल देहाकडे पहात राहिले. वेड्यासारखे. सारं त्यांना तें अनपेक्षित होतं. जें घडलं होतं त्यावर त्यांचा विश्वासच बसत नव्हता. त्यांनीं बाहेर पाहिलं. आकाश निर्विकार होतं. काळोख पाषाणासारखा कठीण होता. या पाषाणावर झिरपत असणारा दिव्यांचा प्रकाश भेसूर वाटत होता.

दसुकाकांना आधार हवा होता. कुणाचाहि—वरच्या आकाशाचा—भोंवतालच्या काळोखाचा.

त्यांना आतां सारं आठवलं. त्यांचा रजा घेण्याचा आग्रह. सगळ्या नातेवाईकांना भेटण्याचा हट्ट—आपल्या साऱ्या इच्छा बोलून टाकण्याची गेल्या कांहीं दिवसांतली त्यांची धांदल—आणि त्यांची अखेरची इच्छा—गणपति भंवतालची आरास—गीतरामायण.....

त्यांना सारं सारं आठवलं—कांहीं तासापूर्वीं आपल्याशीं मोकळेपणीं बोलणारी सुधाकाकू. . .त्यांना चाहूल लागली होती—मरणाची—अखेरच्या घटकेची.....

—ते घरीं आले. त्यांनीं ती समई काढली. ती पुसून नीट ठेवली होती. भांडींहि रचून व्यवस्थित ठेवली होती. घर पुसून साफ ठेवलं होतं. संसाराची घडी कशी ठाकठीक बसवली होती.

प्रत्येक वस्तूकडे ते पहात राहिले. त्यांनीं साऱ्या मुलांना जवळ केलं. दोन जुळ्या मुलांना कवटाळून धरलं. सुधाकाकूंचा विछाना तसाच पसरला होता. बामचा उग्र वास अजून रेंगाळत होता. दसुकाकांना भडभडून आलं. त्यांनीं लहान पोरक्या मुलासारखा हंबरडा फोडला. ओक्साबोक्शीं ते रडूं लागले.

. . .पाणावलेल्या डोळ्यांनीं त्यांनीं पाहिलं. पुसून ठेवलेली समई लकाकत होती. भांडींहि तकाकत होतीं.

तिथं बघत असतानांच दसुकाका एका खोल अंधाऱ्या पोकळींत बुडत चालले. त्यांनीं मुलांना गच्च धरून ठेवलं. त्यांना आधार हवा होता. त्या अंधाराच्या लाटांनीं खदखदणाऱ्या त्या खोल पोकळीची त्यांना भीति वाटत होती.

●●●

रंग देवता उधळित आली
भाग्य लेवुनी सृष्टी धाली

ऐन दिवाळींत नाट्योत्सव

गेल्या वर्षभरांत

राजकीय रंगभूमीवर

पाऽऽर पडलेली नाटकें!

१६ पानांची दुरंगी बेफाम बिंगचित्रमाला

"नाट्योत्सवा" ची तिकिटें दिवाळी अंकांतच मिळतील. त्वरा करा.

अनुक्रमणिका





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट




**पूर्व कथासूत्र**

शत्रूच्या शिबिरांत जाऊन ॲलिसननें अन्न मिळविलें. आपल्या खड्ड्यांकडे तो परतला. अँजेला तिथें नव्हती. तिचा शोध घेत तो समुद्रावर गेला. ती भेटली. भीतीमुळें ती गांगरली होती. ती त्याला बिलगली. नंतर दोघांनी भरपूर अन्न खाल्ले. बऱ्याच दिवसांनीं तें त्यांना मिळालें होते. त्या स्पर्शानें ॲलिसन मात्र संत्रस्त झाला. तिच्या स्पर्शासाठीं आतुर झाला. त्यानें तिला बळजबरीनें जवळ घेतलें. असह्य होऊन ती अंधारांत पळाली. परमेश्वराच्या प्रार्थनेंत रंगली. अंगांत अंगार फुलला होता.

ले. चार्लस् शॉ

अनु. प्र. श्री. नेरुरकर

## [१३]

### ताप

**ॲलिसननें** त्या जोगिणीला त्या बंगल्यांत खालीं ठेवलें आणि तो बाहेर गेला आणि पायऱ्यांवर विचार करण्यासाठीं बसला. त्याच्याजवळ औषध नव्हतं. आणि आजारी माणसाची सेवा त्यानें कधीं केली नव्हती. प्रथम तो बसला आणि रात्रीच्या काळोखांत पहात राहिला. तो कांहीं करूं शकेल असं कांहीं नव्हतं, असा विचार त्याच्या मनांत आला. मग पॅसिफिकमध्यें आपल्या नोकरीचं शिक्षण घेत असतां कांहीं साध्या गोष्टी त्याला शिकविण्यांत आल्या होत्या त्या त्याला आठवल्या. त्याला आठवलं कीं, ताप आलेल्या माणसाला विपुल पाण्याची आवश्यकता असते. त्याला आठवलं की, प्यायचं पाणी उकळलं पाहिजे. त्याला आठवलं कीं, आजारी माणसाला स्वच्छ ठेवणं जरूरीचं असतं. क्षणांतच त्याच्या मनानें त्या परिस्थितींतील हताशपणा दूर घालवला आणि कांहीं करतां येणं शक्य आहे का याचा विचार तो करूं लागला. त्याला ताकद आली आणि आपला दुबळेपणा, अप्रिय कर्मे करण्याची त्याची नैसर्गिक अनिच्छा या पलिकडे जाऊन तो उभा ठाकला. कामें पुरी करायची होती आणि ती करणारा तो एकटाच होता. तो उठून उभा राहिला. आणि विचार करतां करतां त्यानें आपल्या कानाला हिसका दिला. मग त्याने रात्रीकडे अल्पकाल नजरफेंक केली. तो वळला आणि त्या आजारी स्त्रीच्या शुश्रूषेला प्रारंभ करण्यासाठीं तो आंत गेला.

पुष्कळ दिवस ती मरणाच्या पंथाला लागली होती. पहिल्यांदा ती आपल्या पोटांत कांहींच टिकूं देत नव्हती. परंतु तिला उकळलेलें पाणी पाजल्यावर तें थांबलं. जेव्हां ती कुशीवर वळत नसे, आडदांडपणें बडबडत राही, तेव्हां ती एक प्रकारच्या अनैसर्गिक झोपेच्या गुंगींत पडून राही. एकदांच नव्हे तर कितींदा तरी ती मृत झाली आहे असं त्याला खात्रीनें वाटलं होतं.

धीमेपणानें व जें कांहीं करणं जरूरीचं होतं तें पुनःपुनः करीत, त्याने रात्रंदिवस तिची काळजी घेतली. तिच्या असहाय्यतेनं त्याला खिन्न केलं, कारण ती आतांपर्यंत एक ताकदवान व स्वतंत्र स्त्री होती. त्याला ठाऊक असलेली सिस्टर अँजेला ती इतःपर राहिली नव्हती. हें जें कुणी माणूस त्याच्या शुश्रुषेखालीं होतं तें एखाद्या लहान मुलासारखं होतं. तिच्याबद्दलच्या आदरामुळें फक्त काळोख पडल्यावर तो तिला आंघोळ घालायचा. तिचें अंग झांकण्यासाठीं त्याने मऊ पानें आणली आणि एक प्रकारचा बिछाना त्याने केला. त्यावर ती पडून राही. तोंवर त्याला येतील तितके चांगले असे तिचे कपडे तो धुवायचा. ते तो पावसानंतर पडणाऱ्या चकचकीत उन्हांत वाळत ठेवायचा. यावेळीं पाऊस निघून जायचा, हें स्वतःचं सुदैव पाहून तो पुष्कळदा आश्चर्यचकित व्हायचा.

तिची शुश्रूषा करण्यांत तो वाकबगार व हळुवार बनला. वासना त्याला सोडून गेली होती किंवा या बाबतींत तिने आपलं रूप पालटलं होतं. तिच्यासाठीं त्याने जें जें कांहीं सर्व केलं, त्यांत कुतूहलाचा प्रश्न नव्हता; लैंगिक लक्षवेधीपणाची



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

कोणती भावना नव्हती. एक प्रकारें त्याने हातीं घेतलेल्या कामांत त्याला आनंद वाटत होता. तो एक साधा प्रामाणिक मनुष्य होता आणि त्याला पार पाडण्यासाठीं एक काम देण्यांत आलं होतं. दुसऱ्या कोणत्याहि गोष्टींचा विचार न करतां तो आपलें सारें लक्ष त्यांत गुंतवित होता. त्याच्या विचारांत ती पवित्र जोगीण आतां मुळींच उरली नव्हती. ती स्त्री कीं, जिच्यावर त्याची वासना गेली होती ती सुद्धां आतां अस्तित्वांत नव्हती. त्या दोहोंच्या ठिकाणीं आतां एक आजारी मूल होतं कीं, जें पूर्णपणें त्याच्यावर अवलंबून होतं.

आणि लवकरच ती बरी झाली. सुदैवानें म्हणा, किंवा ॲलिसनच्या शुश्रूषेमुळें म्हणा, किंवा तिच्या स्वतःच्या बळावर म्हणा—किंवा, तुम्हांला वाटलं तर, परमेश्वरी योजनेला ती जिवंत राहणं आवश्यक होतं म्हणून म्हणा—ती पुनः चांगली झाली होती; निदान शरीरानें तरी. ती एक अशक्त, दयनीय अशी स्त्रीची छाया होती पण तिचा ताप बरा झाला होता.

एकदां दुपारीं उशीरा ॲलिसननें तिच्या खोलींत पाऊल टाकलं. ती आपल्या पर्णशय्येवर पडली होती. तिच्या चर्येवरून ताप उतरला होता; विचित्र कुतूहलानें तिचे डोळे तिच्या सभोंवार पहात होते. तिने त्याचं पाऊल ऐकलं आणि आपलं मस्तक उचलण्याचा तिने प्रयत्न केला; परंतु ती अगदीच अशक्त झाली होती. त्याने खाली तिच्याकडे पाहिलं तेव्हां त्याला पहाण्यासाठीं आपलं डोकं वळविलं. हळूहळू तो कोण होता तें तिला उमगलं, हें तो न्याहाळूं शकला. मग विचित्र व अस्वाभाविक अशी टक लावीत तिचे डोळे सताड उघडे झाले. एका हातानें ती आपलें उरोज बडवूं लागली आणि तिच्या मुखांतून एक उंच वेडपट हास्य खळाळत बाहेर पडलं. ॲलिसनने स्तब्धपणें तिच्याकडे पाहिलं, मग त्याने पाठ वळवली व तो बाहेर गेला आणि येणाऱ्या रात्रीकडे तो टक लावून पहात राहीला.

जिला तो जबाबदार होता अशी आतां एक चांगली पण वेडी स्त्री त्याच्या हवालीं होती. बंगल्यांत आतां फक्त एक मांसाचा डबा, तीन सिगारेटी, सात आगपेट्या व ऑस्ट्रेलियन मिठाईचा एक तुकडा शिल्लक राहिला होता.

त्या रुग्ण स्त्रीची शुश्रूषा करतांना त्या सर्व दिवस व रात्रींमध्यें ॲलिसनने एकाच विचारापासून बळ पैदा केलं होतं कीं, आज ना उद्यां त्यांचं नष्टचर्य संपुष्टांत येणं भाग होतं. एकतर ती मरणार होती किंवा बरी होणार होती. अच्छा, ती मेली नव्हती. तापांतून ती बरी होऊन उठली होती. परंतु त्याला अंत नव्हता, कारण आतां ती डोक्यानें आजारी झाली होती.

असं कांहीं घडणं शक्य आहे याची त्याने कल्पना केली नव्हती. आतां त्याचं मन तें सत्य संपूर्णपणें स्वीकारूं शकत नव्हतं. सुस्तपणें त्या रात्रीकडे पहात तो तेथें उभा राहिला आणि आपण देहानें व मनानें किती थकून गेलो आहोंत याची त्याला जाणीव झाली; एकाएकी त्याचे पाय त्याला दुबळे झाल्यासारखे व त्यांचा आधार सुटतो आहे, असे वाटले. त्या काळोखांत भिंत शोधण्यासाठीं हात पुढे सारीत तो संभोवार वळला.

मग, अकस्मात तो थांबला आणि त्याच्या संभोवार उसळलेल्या तेजस्वी प्रकाशाकडे त्याने पाहिलं. त्याचा अर्थ समजून घेण्याचा प्रयत्न करीत त्याने एक किंवा अधिक सेकंद त्याचं सूक्ष्म निरीक्षण केलं. मग त्याच्या मेंदूंत प्रकाश पडला आणि तो प्रकाश कसला होता हें त्याने ओळखलं. त्या उपसागरावर शोध-प्रकाशासह एक जहाज आलं होतं.

त्या प्रकाशानें ती तर आणि त्या तरीभोंवतालच्या इमारती धुंडाळल्या. तो वर गेला आणि पाठीमागचं जंगल त्याने शोधून पाहिलं—मग त्याला तो बंगला आढळला आणि त्या संभोवार त्याने शोधून पाहिलं. इकडे फक्त एका झुडपाआड लपलेला ॲलिसन निरखून पहात होता.

ॲलिसनच्या डोक्यांत फक्त एकच विचार होता—जपानी लोक! आपण थकलो भागलो आहोंत हें तो त्या क्षणाला विसरला. तो धांवतच त्या बंगल्यांत गेला आणि त्याने त्या जोगीणीला वर उचललं. ती आतां स्तब्ध होती. तिला उचलून त्या जंगलाकडे चिखलांतून तो बाहेर धांवत सुटला. आपण व तें जहाज यामध्यें तो बंगला येईल अशी दक्षता तो घेत होता. तापानंतरसुद्धां सिस्टर अँजेला त्याला जड वाटली, कारण तिच्या शुश्रूषेचा ताण पडून तोही अशक्त झाला होता. तो खाली जमिनीवर पडून राहिला. आपली ताकद पुनः देहांत गोळा होईपर्यंतच फक्त पुरेशी विश्रांती घेण्याचा त्याचा बेत होता. मग अगदीं तितक्यांतच तोफांच्या प्रकाशझोतांनीं रात्र उजळून टाकली.







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

ॲलिसनने त्या बंगल्यांत प्रकाशझोत पाहिले, गोळ्यांचा आवाज ऐकला आणि जमीन हालते आहे असं त्याला वाटलं. तोफांचा गडगडाट थांबला आणि तो प्रदेश धुंडाळीत शोध-प्रकाश बाहेर झळाळला. तो बंगला जळत होता.

त्या जोगीणीच्या मुखांतून एक बारीक, चितातूर अशी आरोळी बाहेर पडली. त्याने तिला तिच्या पायावर उभी केली व म्हणाला, "चल, निघूंया. आपल्याला लपून राहिलं पाहिजे."

"ला, ला, ला," वेड्या उंच आवाजांत ती ओरडली. "सर्व दिवे पेटले आहेत. तूं घंटा वाजवूं शकतेस, सिस्टर."

त्यामुळें मात्र तो पुरताच पराभूत झाला. त्याच्या पुढ्यांत ओलेंचिब काळेकुट्ट जंगल होतं. त्याच्या पाठीमागे जळणारं घर होतं आणि शत्रूचं जहाज होतं. त्याच्या जवळ एक वेडपट बाई होती. त्याने एक खोल उसासा टाकला मग शिव्या शाप दिले आणि त्या झुडुपांतून त्या वेड्या जोगीणीला खेंचून नेण्याची शक्ती कशीबशी त्याला प्राप्त झाली.

लवकरच आपल्या श्रमांच्या धडपडीमुळें तो घामाघूम झाला. त्या जोगीणीला अर्धे वाहून नेत, अर्धे ओढीत नेत, त्या चिखलांतून आणि वेलींतून तो धडपडत होता, तसा आपल्याला ताप येत आहे असा विचार त्याच्या मनांत आला. अंगिकारलेल्या कामाबद्दल व आपल्या परिस्थितीबद्दल हताश होत होत कधीं कधीं तो थांबत असे. त्याच्या मनांत भीतीनें प्रवेश केला. तो हरवला होता आणि त्या जंगलाच्या उष्ण रसरसत्या भागांतून, चिखलांतून, काळोखांतून तो कधींच बाहेर पडणार नव्हता

आनंदाची बातमी !



बरं कां, आजपासून मी सिगारेट सोडली....

असं ती भीति त्याला सांगू लागली. त्याच्या हातांत व पायांत कळा येऊं लागल्या, त्या चिखलांतच डुंबून रहावं आणि झोप घेत तिथेंच पडावं असं वाटणारी इच्छा दूर सारण्यासाठीं त्याला झगडावं लागलं.

त्या जंगलांतून चालत असतां त्याला विचित्र जागतीं स्वप्नें पडूं लागली. त्याला स्वप्न पडलं कीं, आपली युद्धाची पिशवी खांद्यावर घेऊन कॅलिफोर्निया शहरांतून तो चालला आहे आणि लोकांचे थवे त्याच्याकडे आश्चर्यानें पहात आहेत. आपल्या स्वप्नांत त्याने ती पिशवी खाली टाकली आणि तो खाली वाकला व ती वर उचलण्याचा प्रयत्न करूं लागला. मग त्याला आठवलं आपण प्रत्यक्ष कुठं आहोत तें आणि त्याच्या लक्षांत आलं कीं, त्याने सिस्टर अँजेलाला खाली टाकलं होतं. तिला घाबऱ्याघुबऱ्या दबलेल्या आवाजांत हांक मारीत त्या काळोखांत तो इकडे तिकडे सैरावरा गेला. त्याच्या हाताला तिचा जोडा मिळाला आणि त्या चिखलांत थपकन मारीत व खदखदा हंसत त्याने तो घट्ट धरून ठेवला. मग त्याची बुद्धि ठिकाणावर आली आणि त्या जोगीणीच्या हातासाठीं म्हणून तो चांचपडूं लागला. ती निपचित पडली होती आणि त्याच्या हांकेला तिने उत्तर दिलें नाहीं.

"अच्छा, कांहीं झालं तरी आतां ती मेली आहे असं मला वाटतं" तो स्वतःशीच म्हणाला. मग सारं कांहीं त्याच्या डोळ्यासमोर काळं काळं झालं.

तो जागा झाला तेव्हां त्याने आपल्या संभोवार पाहिलं. त्याचं मन अधिक स्वच्छ झाल्यासारखं त्याला वाटलं आणि त्या जोगीणीला तो संभोवार धुंडाळूं लागला. त्याने तिचें श्वसन ऐकलं आणि अजून त्याच्या शिरावरचा बोजा उतरला नव्हता हें जाणून त्याने उसासा सोडला.

पुनः धडपडत तो आपल्या पायावर उभा राहीला आणि पुनः त्याने तिला उचलली. पश्चिम किनाऱ्याच्या वाळूवर त्याचं पाऊल पडेपर्यंत तो वेडा-वाकडा चालत राहीला. तेथें त्याने त्या जोगीणीला खालीं ठेवलं आणि तिच्या जवळ तो धाडकन् कोसळला.

"ओहोटी" तो स्वतःशीच म्हणाला. तेथें समुद्राचा उग्र वास येत होता. वाळूवरील कवचधारी माशांचे लहानसे व रुक्ष आवाज त्याने ऐकले. तो जोरजोरानें विचार करू लागला; कारण ओहोटीच्या वेळीं खेकडे कसे वागतात हें त्याला ठाऊक होते.

आपल्या हातांनीं त्या वाळूंत त्याने एक खड्डा खणला आणि फक्त तिचा चेहरा अनाच्छादित राहील इतपत तिच्यावर वाळू पसरीत त्याने तिला आंत लोटलं मग तिच्याजवळ त्याने दुसरा एक खड्डा तयार केला, त्याच्या आंत गेला आणि स्वतःला त्याने वाळूने झांकून घेतलें. स्वतःला त्याने समुद्राकडील बाजूला घालून घेतलं; कारण पाणी तिथवर आलं तर त्याला तें प्रथम जाणवणार होतं. मग त्याला झोपायचं होतं.

सारी रात्र वखवखलेले खेकडे त्यांच्यावर हल्ला करीत होते. आपल्या हाताकडे व तोंडाकडे त्यांचं अस्तित्व जाणवून ॲलिसन सारखा जागा होत होता आणि त्यांच्यावर प्रहार करीत होता,






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# आवाज

# शब्दोन्मेष आणि चित्र-प्रतिभा यांचा अपूर्व मिलाफ

गेलीं २१ वर्षे ह्या संगमाचें दर्शन मराठी रसिकांना घडविणारें पहिलें लोकमान्य आतां (राजमान्य) वार्षिक.

दिवाळी अंक

१९६५

- मराठीच्या अग्रगण्य मानकऱ्यांची (मानधन साहित्यासह) हजेरी.
- **'कुंचल्याची केवळ किमया'** असें बहुरंगी मुखपृष्ठ! व सहा बहुरंगी चित्रें-- **"रंगविलासी"**
- **तीन 'दिलचस्पी' विंग चित्रमाला**–
  - राजकीय रंगभूमीवर पाऽऽर पडलेलीं नाटकें.
  - मराठा गडी (अप) यशाचा धनी.
  - दीपावलीचा पत्रकार "टॅब्लो."
- मराठींतल्या **"फॉरेन रिटर्न्ड"** साहित्यिकांना भेटलेली **अविस्मरणीय स्त्री !! (वा स्त्रिया)**

**नुसती नांवे वाचा** – अरविंद गोखले, अच्युत बर्वे, व्यंकटेश माडगुळकर, रमेश मंत्री, जयवंत दळवी, सदानंद रेगे, दिलीप चित्रे, प्रा. अनंत काणेकर, पु. शि. रेगे, वसंत देशमुख आणि इतर बरेच साहित्यिक.

- चिमटे, गुदगुल्या, बोचकारे काढणारी व्यंगचित्रें, वात्रटिका, वगैरे.
- निवडक कविता व विडंबक गीतांचे **"झेंडूचें गोंडे"**

**प्रसिद्ध होणार! प्रसिद्ध झाला!! संपला!!! [गत वर्षीचें 'सत्य' कथन!!]**

यंदाचा अंक **दि. १७ ऑक्टोबरला** प्रसिद्ध होणार!! मागणी नोंदवा.

२५ सप्टेंबरच्या आंत आलेल्या मागणीचाच विचार होईल. प्रति मोजक्या! [एजंटांनीं मागणी त्वरित नोंदवावी]

पृष्ठें २२५ मूल्य ३.५० रुपये + र. पो. १ रु.

अधिक माहिती : दलाल आर्ट स्टुडियो, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४.









अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

त्यांना शिव्या मोजीत होता. त्या काळोखांत ते अदृश्य झाल्यावर एक हात त्या जोगीणीच्या तोंडावर संरक्षणासाठी ठेवीत तो पुनः झोपी जायचा. अशा रीतीनें, झोपत व जागत, ती जोगीण त्याच्या जवळ तिच्या जिवंत थडग्यांत पडली असतांना, पहाटेनें त्या परदेशी किनाऱ्याला प्रकाशित करीपर्यंत, प्रायव्हेट हँक ॲलिसनने आपलें कर्तव्य बजावले.

सकाळीं तिचे डोळे उघडेपर्यंत ॲलिसनने त्या जोगीणीला हलवून जागं केलं. "चल" तो म्हणाला. "आपल्याला इथें राहतां येणार नाहीं. काल रात्रीं तिथें त्या उपसागरांत एक जहाज आलं. त्या जागेवर सर्व बाजूंनी त्यांनीं तोफांचा भडिमार केला आणि त्यांनीं तें घर जाळून बेचिराख केलं. आपल्याला इथून गेलं पाहिजे आणि लपून राहिलं पाहिजे."

तिने विचित्र नजरेनें त्याच्याकडून पलिकडे पाहिलं. पक्ष्यासारख्या नजरेनं. ती उभी राहिली आणि लहान मुलाप्रमाणें त्याच्या मागून चालू लागली. आपल्या जुन्या खड्ड्यांकडे तिला नेत असतांना, त्याने तिला तो धोका समजून सांगण्याचा प्रयत्न केला, परंतु तिचं पिसाळलेलं मन दुसऱ्या जगांत वावरत होतं.

सिस्टर अँजेलासाठीं म्हणून जो खड्डा होता, त्याचं आतां माती, लोखंड व वेलींच्या ढिगाऱ्यांत रुपांतर झालं होतं. त्याच्या स्वतःच्या खड्ड्याला अजून कांहींसा विवरासारखा आकार होता. अजूनहि तो लपण्याची जागा म्हणून उपयोगी पडावा. त्याने तो आणखी जरा मोठा केला, त्या जोगिणीला आंत ढकललं आणि तिला वृक्षपर्णांच्या राशीवर स्थानापन्न केलं.

"तूं इथं बस, तोपर्यंत बाबा तुला आईस्क्रीम घेऊन येतील हं...." अशी पोरकट आज्ञा करीत तो म्हणाला; कारण आणखी काहीं त्याला सुचतच नव्हतं. ती मुलासारखी होती. ती स्वेच्छेनें खाली बसली आणि आळसावून आपल्याच बोटांशी खेळली.

त्याने पाहिलं कीं, तिच्या जपमाळेच्या मण्यांवर चिखल चढला होता. ते अजून तिच्या गळ्यांत लोंबत होते. कां तें न कळतांन्त, त्याने हळुवारपणें ती जपमाळ बाहेर काढली. पानांनीं ते मणी त्याने स्वच्छ केले आणि ती जपमाळ परत त्याने सिस्टर अँजेलाच्या हातात दिली. ती खाली टाकणार नाहीं एवढी काळजी त्याने घेतली. तिने ते मणी घट्ट धरून ठेवले आणि आपल्या बोटांतून त्यांची चाळवाचाळव केली. एखाद्या आंधळ्या माणसासारखी–जो एखादी गोष्ट निश्चित करण्याचा प्रयत्न करतो–तशी. मग–हळुहळु सौम्य, अस्पष्ट गुणगुणत, तिने प्रार्थना सुरू केली. एकाएकी तिच्या मुद्रेंत बदल झालेला ॲलिसनने पाहिला; ती कांहींशी अधिकच तिच्या स्वतःसारखी दिसू लागली होती. तो नौसैनिक संथपणें बाजूला झाला. त्याने आतां ओळखलं कीं, ती निदान त्या खड्ड्यांत बसून राहील.

त्याला दोन गोष्टी करायच्या होत्या शत्रू काय करीत होता तें शोधायचं होत आणि शोधायचं होतं कांहींतरी खाण्यासाठीं.

तो टेकडी उतरून खाली गेला तेव्हां पक्षी नेहमींपेक्षां अधिक चिवचिवाट करताहेत असं त्याला आढळलं; पण त्याच्या डोक्यावरून अगणित पक्षी किंचाळत जाईपर्यंत, त्याचें कारण त्याला उमगलें नाहीं. तो थबकला, त्याने निरखून पाहिलं आणि ऐकून घेतलं. मग स्वतःला त्याने लपविलं आणि पुनः निरीक्षण केलं, ऐकलं. अगदीं त्याच्या पलिकडे उघड्या जागेतून सहा जपानी सैनिक चालत गेले. त्यांनीं हिरव्या रंगाचा पोषाख केला होता आणि प्रत्येकाजवळ एक सबमशिनगन होती. हुकुमतीखालीं कर्तव्य बजावणाऱ्या माणसांच्या पद्धतीनें ते निस्तब्धपणें व सहेतुकपणें हालचाल करीत होते. त्याची खात्री झाली कीं, त्या संपूर्ण बेटाचा आता शोध घेण्याचा त्या जपान्यांचा इरादा होता. "शेवट आहे" त्याचं मन म्हणालं आणि तो खड्ड्याकडे परतला. "आतां संपलं सारं" त्याचं मन म्हणालं आणि तो खड्ड्याकडे परतला. जेव्हां शत्रूचा डोळा त्यांना शोधून काढणार होता तेव्हां त्याला सिस्टर अँजेलाच्या जवळ रहायचं होतं.

त्या खड्ड्याच्या कोपऱ्यांतील घाणींत अर्धी छपलेली अशी ती झोपली होती. तिची झोप अस्वस्थ होती; तिचे हात हालचाल करीत होते आणि चिंतातुर असे लहान आवाज ती करीत होती. उघडच ती स्वप्नपिडीत होती. ॲलिसनने खालीं अंग टाकलं. त्याला खूप खूप दमल्यासारखं वाटत होतं आणि झोपेखेरीज इतर कोणत्याहि गोष्टीची पर्वा करण्याचा मनस्वी वीट आला होता.

रात्रीच्या सुमारास पुनः पाऊस सुरू झाला. सावकाशीनं ॲलिसनच्या लक्षांत आलं कीं, तो पाण्यात पडला होता. भिंताडावरून लहान लहान ओघळ बनून पाणी खालीं वाहून येत होतं. जमिनीवर त्याचं डबकं तयार होत होतं. त्याचा त्याने विचार केला, मग त्याकडे लक्ष देण्याचं त्यानं बंद केलं. आंत खड्ड्यांत त्याबद्दल कांहींच करतां येण्यासारखं नव्हतं आणि बाहेर सर्वत्र


विनोदाचा गिरसप्पा!
बऱ्याच वर्षांनीं पुन्हा एकदां
यंदाच्या दिवाळींत
झेंडूचे गोंडे!
वाचकांना व कवींनाही
खदखदून हंसविणार!
पण रागवायचं नाहीं, अन् रुसायचं नाहीं हं!
त्यासाठीं दीपावलीचा दिवाळी अंक वाचावा लागेल!


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

पावसाची संतत धार लागली होती. एकदा त्याने सिस्टर अँजेलाला हांक मारली आणि तिने जेव्हां उत्तर दिलं नाहीं तेव्हां तो उठला आणि त्या काळेपणांत त्याने तिला चांचपून पाहिलं. त्याच्या हातांनीं तिला स्पर्श केला तेव्हां त्याला एक विचित्र, अवास्तव कल्पना जाणवली कीं, ती हवेंत तरंगत असावी. ती अजून जिवंत आहे यामुळें संतुष्ट होत तो दूर झाला आणि चिखलांत पडून राहिला. अस्वस्थपणें तो झोपला; आणि चपळ, भीतिदायक स्वप्नांनीं त्याचा पिच्छा पुरवला.

## [१४]

### "मला हवं, तूं जाणून घ्यावंस"

**ॲलिसन** पुनः उठला तेव्हां जवळ जवळ सकाळ झाली होती आणि पाऊस थांबला होता. अर्ध काळोखांत तो पाहू शकला होता कीं, ती जोगीण उठून बसली होती. तो उठण्याचा प्रयत्न करीत होता इतक्यातच हळु संथ आवाजांत सिस्टर अँजेला म्हणाली, "मिस्टर ॲलिसन, तूंच कां तो ? मी तुला पाहूं शकत नाहीं. तूंच कां तो ?"

ॲलिसन थांबला. आपल्या कानावर विश्वास ठेवण्याचं सामर्थ्य क्वचितच त्यांच्यात उरलं होतं. वेडेपणाचं चिन्ह नसलेला तिचा आवाज शांत होता. तिच्या शब्दांना अर्थ होता.

"होय" काळोखांत आपलं डोकं तिच्याकडे वळवून तो म्हणाला, "होय, तो मीच आहे, मला वाटतं. तुझं ठीक आहे ना, सिस्टर?"

"मी–मला तसं वाटतं. मला फार थकल्यासारखं वाटतं. हें घर फार ओलसर झाल्यासारखं वाटतं आहे."

"आपण घरांत नाहीं आहोंत. आपण खड्डयात आहोंत. पाऊस सारखा आंत येतो आहे. दिवसामागून दिवस पाऊस पडतोच आहे. तूं पाऊस पाहिला नाहीस कां ?"

क्षणकाल स्तब्धता पसरली. ती म्हणाली, "घराचं काय झालं ?"

"जपानी लोक परत आले. आम्हाला पळून जावं लागलं, वेगानें. तूं होतीस–तूं होतीस–तुला ताप आला होता."

"ओऽ" ती साश्चर्य म्हणाली.

"तुला कांहीं आठवत नाहीं कां ?" त्याने विचारलं.

"मला–मला–तिथें आग लागल्यासारखी वाटली होती" ती थांबली "बस्. तेवढंच." अस्पष्टपणें ती पुढे म्हणाली.

"तुला ताप होता," तो म्हणाला, "तुझी शुद्धी ढळली. तूं तापांतून बरी झालीस, पण अजून तुझं मन ताळ्यावर नव्हतं. ते परत आले होते हें तुला ठाऊक नव्हतं. मी खेचून नेलं–अच्छा; मी तुला इथवर आणलं. आतां फक्त एकच खड्डा आहे; दुसरा धुऊन गेला."

पुनः स्तब्धता पसरली. तिच्याकडून कांहीं शब्द येईल म्हणून वाट पहात तो बसला. अजून त्याला आजारी असल्यासारखं वाटत होतं आणि एखाद्या पीडेसारखी त्याला भूक जाणवत होती.

"मिस्टर ॲलिसन," ती मंद आवाजात म्हणाली, "आतां काय वरं घडणार आहे ? आपणाला धोका आहे कां ? तूं मला सांगायलाच हवं."

"परिस्थिती याहून आणखी कठीण होणं शक्य नाहीं," तो म्हणाला, "सगळीकडे या बेटावर जपानी लोक पसरले आहेत. शोधताहेत. आणि आपल्याजवळ नाहीं अन्न. या बिळांत आपण बसू शकतो आणि मरू शकतो किंवा आपण बाहेर पडू शकतो आणि तिथवर चालू शकतो आणि त्यांना आपला तावा घेऊं देऊं शकतो."

तो निमूट बसला. पराभवाची त्याला खात्री वाटत होती. तो इतका कांहीं थकून गेला होता कीं, त्यांचं भवितव्य पुढें काय होणार आहे याची देखील त्याला पर्वा नव्हती.

ती बोलली तेव्हां त्यांच्या परिस्थितीसंबंधीच्या त्याच्या विधानाशी तिच्या शब्दांचा कांहीं संबंध नव्हता असं वाटलं. "एका क्षणापूर्वी" विचित्र अव्यक्तिगत स्वरांत ती म्हणाली, "क्षणापूर्वी तूं म्हणालास कीं, मला ताप आला होता ?"

त्याने आपलं मस्तक वर केलं. तिच्या प्रश्नानं त्याचं सुस्त मन चाळवलं गेलं.

"तें खरं आहे," तो उत्तरला.

"तूं म्हणालास कीं, माझं मन ताळ्यावर नव्हतं."






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"होय."

"मला कांहीं आठवतं कां असं तूं विचारलंस ?"

"पुन: बरोबर" तो म्हणाला.

किंचित् काल स्तब्धता पसरली.

"तूं जाणून घ्यायला मला हवं," ती म्हणाली, आणि आता तिचा स्वर पालटला. तिला बोलणं कांहींसं अवघड होत होतं असं भासलं. ती चलितचित्त झाली, मग पुढें बोलू लागली. "तूं जाणून घ्यायला मला हवं कीं—कीं जें मला आठवतं—जेव्हां जें घडलं—जेव्हां, म्हणजे, मला ताप येण्यापूर्वी. तें तूं जाणून घ्यायला हवं आहे मला."

म्हणजे तिला जें कांहीं म्हणायचं होतं तें हें. तिला हवं होतं बोलायला त्या जुन्या गोष्टीविषयीं. . .त्या दूरवर, किती काळापूर्वी घडलेल्या. आता अशा बोलण्याच्या अन्याय बुद्धीबद्दल, मूर्खपणाबद्दल त्याला एक प्रकारचा राग आल्यासारखा वाटला. आता प्रश्न होता कीं, त्यांनीं भुकेनें मरायचं कीं, शत्रूच्या हातांत स्वतःला सोपवून द्यायचं. स्त्रिया म्हणजे विचित्रच असतात, त्याच्या डोक्यांत विचार आला आणि ह्या जोगीणी स्त्रिया तर सर्व स्त्रियांत जास्तींत जास्त विचित्र असतात. आता त्याचा उल्लेख करायचा. . .जेव्हां परिस्थितींत आणखी कांहीं बदल होणं केवळ अशक्य होतं. . अशावेळीं !

अकस्मात त्याचा राग निवळला. पण म्हणून कांहीं त्यामुळें परिस्थितींत बदल घडला नाहीं. त्याच्या वासनेप्रमाणेंच त्याच्या रागाची वेळ टळली होती. आपली वासना जवळ जवळ तो विसरूनच गेला होता; ती पार निघून गेली होती व संपली होती कारण आता दुसऱ्या रीतीनें ती त्याची झाली होती. ती त्याची होती कारण तिच्या तापात व वेडेपणांत त्याने तिची शुश्रूषा केली होती. ती त्याची होती कारण आतापर्यंत त्याने तिला शत्रूपासून दूर ठेवण्याची व्यवस्था केली होती, कारण त्याने तिला जिवंत ठेवण्याची व्यवस्था केली होती. अजूनही एक लहान मूल म्हणून तो तिचा विचार करीत होता, त्याचं स्वतःच मूल म्हणून, कारण त्याने तिला वाचवलं होतं आणि तो तिच्यासाठीं विचार करीत राहीला होता. आणि जर तिला त्या जुन्या गोष्टीविषयीं बोलायचं होतं, तर तें ठीक होतं. त्याबद्दल तिला बोलू द्यायला तो तयार होता.

"ठीक आहे" तो म्हणाला, "आतां तें मला कळलं."

"पुष्कळ गोष्टी अशा आहेत कीं, त्यांचा मला उलगडा झालाच पाहिजे." ती, कांहींशी थंडपणानें म्हणाली. "म्हणूनच मला अगोदरच तुझ्याशीं बोललंच पाहिजे—म्हणजे; आपण इथं राहायचं कीं, जपान्यांकडे जायचं हें आपण ठरविण्यापूर्वीच. त्याचं असं, कारण मला ताप आला होता."

"कारण तुला ताप आला होता ?" त्याने विचारलं, गोंधळून.

"होय. असं पहा, जोंपर्यंत मी तापांत होते किंवा त्यानंतर माझं मन ताळ्यावर नव्हतं, तेव्हां काय घडलं तें मला माहीत नाहीं."

तिला तोंड देण्यासाठीं तो चटकन वळला, यावेळीं तो खरोखरच रागावला होता आणि रागावण्यासारखं कांहीं कारण आहे असं त्याला वाटलं.

"तुला जर वाटतं कीं, माझ्याकडून—मी तशा प्रकारचा असेन असं जर तुला वाटतं—मग तूं—तूं—" क्षणभर तो निःशब्द झाला. मग, पूर्वीप्रमाणेंच शक्य तितक्या झपाट्यानें त्याचा राग ओसरला.

"अच्छा," तो म्हणाला, "आत्ता, तूं जो कांहीं विचार करतेस, तो महत्त्वाचा नाहीं असं मला वाटतं."

त्याच्या या उद्रेकामुळें उघड उघडच ती गोंधळून गेली. "मी तुला नीट समजून घ्यावं असं मी इच्छिते." ती म्हणाली. "तू धीर धरण्याचा प्रयत्न केलाच पाहिजे. असं पहा, मी—आपण इतकं कांहीं दुःख भोगलं आहे. कदाचित् माझं म्हणणं मला सरळ सोपं मांडता येत नसावं."

ती स्वतःशीच रडते आहे हें त्यानं पाहिलं नाहीं पण तर्कानें जाणलं, आणि ती दमून गेली आहे आणि भुकेने क्षीण झाली आहे असा त्याने कयास केला. "ठीक आहे, बोल," तो म्हणाला, "मला वाटतं तुझ्या वाट्याला वाईट दिवस आले होते."

"तूं असं पहा," ती अधीरतेनें बोलली; "वेगवेगळ्या प्रकारच्या दोन गोष्टी आहेत. पहिली म्हणजे—ती गोष्ट—तापापूर्वी घडली ती—दुसरी तापात आणि माझं मन ताळ्यावर नव्हतं तेव्हां घडली ती. कृपया माझं बोलणं धीरानें ऐकून घे, मिस्टर ॲलिसन. मी कांहींशी साधी भोळी माणूस आहे. मी—म्हणजे, मी जगांतील चारचौघीसारखी नाहीं. आम्हा जोगिणींना ज्यांच्याबद्दल कांहींच ठाऊक नाहीं अशा कितीतरी गोष्टी आहेत—पुष्कळ गोष्टी कीं, ज्यांचा आम्ही विचार करीत नाहीं. मी समजण्याचा प्रयत्न करते आहे—खरोखर मला त्याची समज पडू लागली आहे अशी मी आशा करते— जे कारण झालं—तुझ्यातील त्या बदलाचं."

आपली तर्कसंगति त्याला उघड करून दाखविण्याची ती प्रचंड खटपट करीत होती.

"मला तें समजून घ्यायचं आहे" ती पुढें बोलू लागली, कारण जर तें मला समजूं शकलं तर मी अधिक शहाणी स्त्री आणि अधिक चांगली जोगीण ठरेन. म्हणून, तूं पहा, मी सारखा विचार करते आहे."

"होय," तो बोलला. त्याने बोलावं ही तिची अपेक्षा त्याने ओळखली. "होय, तूं निश्चितपणेंच विचार करीत आहेस."

"असं पहा" ती म्हणाली, "ताप तर होता आणि मी सहिरी बहिरी झाले होते."

"म्हणजे तूं तापाचाच विचार करीत आहेस ?" त्याने विचारलं.

"तूं माझी काळजी घेतलीस ? तूं माझ्यासाठीं श्रम घेतलेस ?"

"तें खरं आहे."

"तुला मला स्वच्छ ठेवावं लागलं—आणि कोरडं—आणि मला अन्नपाणी द्यावं लागलं आणि—आणि माझ्यासाठीं कांहीं करावं लागलं ?"

"अर्थातच," तो उत्तरला, "तें करायला केवळ मीच काय तो होतो."

ती इतका वेळ स्तब्ध राहिली नि त्याला वाटलं, तिचं बोलून संपलं असावं.

"सिस्टर, तुला फार भूक लागली आहे कां ?" त्याने विचारलं. तिचे विचार तिला नीट मांडता यावेत म्हणून तिला मदत करण्याचा तो प्रयत्न करीत होता.

"नाहीं. छे ! नाहीं. नेहमींपेक्षां कांहीं फार नाहीं. त्याला महत्त्व नाहीं. तुला माझी काळजी घ्यावी लागली—माझी शुश्रूषा करावी लागली—सदासर्वकाळ त्या तापांत आणि त्या भ्रमिष्ट काळांत ?"

"तेंच तर मी तुला सांगितलं."

सिस्टर अँजेलाने आपलं मस्तक नत केलं आणि छोटीशी प्रार्थना ती गुणगुणू लागली. प्रशंसेची व आभाराची प्रार्थना. मग





अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

ती उभी राहिली व त्याच्याकडे आली. आपले हात हलकेच त्याच्या मस्तकावर ठेवीत ती हळुवारपणें म्हणाली, "तुझे कल्याण असो आणि तुझे कल्याण असो, माझ्या प्रिय साथीदारा. आता मला तुझी भीति उरलेली नाहीं. फक्त विश्वास आणि प्रेम. तापांत आणि माझ्या भ्रमिष्टपणांत जें कांहीं सर्व तूं माझ्यासाठीं केलंस तें तुझ्या भल्या, खऱ्या हृदयांतील शुद्ध परमेश्वरी चैतन्य होतं. मला तें सर्व समजूं लागलं आहे असा मला विश्वास वाटतो. त्याची समज मला देण्यांत आली आहे." मग तिने उसासा टाकला व ती दूर झाली. ती बडबडत होती "माझा प्रिय साथीदार."

ॲलिसन जर प्रकृतीनें त्याच्या सर्वसाधारण अवस्थेंत असता, तर तिच्या शब्दांचा व कृतींचा झालेला परिणाम वर्णन करणें कठीण झालें असतें. तथापि, त्या क्षणाला, त्याचं मन व्यावहारीक प्रश्नांनीं व्यापलं होतं. जपान्यांकडे त्यांनीं जावं काय आणि या बिळांत भुकेनें मरण्यापूर्वीं स्वतःला त्यांच्या हवाली करावं काय? असं करण्यांसाठीं त्याने जोगिणीला पाठवावं काय आणि एकटयानेंच जंगलांत आपलं नशिब पहावं काय?

हे प्रश्न मनांत असतांनाच, त्याने चिखलानें माखलेला हात आपल्या डोळ्यावरून फिरविला आणि तो त्या जोगिणीकडे वळला. तिला हळुहळु म्हणाला, "सिस्टर, झालं तें फार छान झालं— खात्रीनें त्यासाठीं मी तुझे आभार मानतो. पण आता आपण काय करायचं याचा विचार करूया. आपण इथें रहायचं कां कीं, मी तुला तिकडे खालीं घेऊन जाऊ आणि त्यांना तुला सांपडू देऊं?"

"पण मला जायचं नाहीं!" ती उद्गारली. "तुला दिसत नाहीं काय? मला इतकं खात्रीनं वाटतं कीं, आपण जायचं नाहीं. देव मला मार्ग दाखवीत नसेल तर मला असं कां वाटावं बरं? कां?"

"तुला वाटेल तसं तूं कर." तो म्हणाला. तो इतका थकून गेला होता कीं, आणखी कांहीं बोलण्याची त्याची तयारी नव्हती. "मला वाटतं आपण एखादा दिवस राहूं शकतो. मी जाऊन पाहीन मला कांहीं सापडतं कां. तूं इथेंच रहा. सिस्टर, मी मागें परतून येईपर्यंत."

भुकेमुळें आणि पायांत येणाऱ्या पेटक्यामुळें तो डळमळत टेकडी उतरून खालीं चालू लागला पण उपसागरावरून युद्धनौकेचा भोंगा किंकाळला आणि मागून पुष्कळ तोफांचा गडगडाट झाला तसा तो तत्काळ थांबला. अवाक आश्चर्यानें ॲलिसन थांबला असता एक विमान त्याच्या डोक्यावरून उडत गेलं. तें इतकं कांहीं खालून उडत जात होतं कीं, तें झाडांच्या शेंड्यावरून दृष्टी आड होण्यापूर्वीं त्याच्या पंखावरील शुभ्र तारे तो पाहू शकला. मग आशा उड्या मारीत त्याच्या मनांत जिवंत झाली. आणि त्याचा श्वास तिने रोधून टाकला. तें अमेरिकन विमान होतं! तो त्या खड्ड्याकडे धांवतच गेला, ओरडत, "सिस्टर! सिस्टर! ते इथें आहेत! विमान दल. ते इथें आहेत. ते थेट माझ्या डोक्यावरून उडत गेले."

त्याने पुढें पाऊल टाकलं. त्या जोगिणीचा चेहरा तिच्या देहापासून अलग होत आहेसा भासला. आणि तो त्याच्या समोर उन्नत होत होता. त्याच्या सभोंवार काळोख वावरत होता आणि तो दूर सारण्याचा त्याने प्रयत्न केला. तो खालीं पडतांनाच सिस्टर अँजेलानं त्याला धरलं आणि त्या खड्ड्याच्या जमिनीवर तो पहुडला. तेव्हां तिनें त्याचं डोकं आपल्या मांडीवर ठेवलं. आपल्या झग्यानें तिने त्याचा चेहरा पुसला आणि त्याच्या डोक्याला आधार देत ती तिथें बसली. आणखी कांहीं ती करूं शकत नव्हती; फक्त प्रार्थना.

[क्रमशः]


तुमचीं एंजिनें दीर्घकाळ कार्यक्षम राहाण्यासाठीं



किर्लोस्कर
ग्लेशिअर लायसन्स

पातळ कवचाचीं
बेअरिंग्ज व बुशेस्
प्रमुख एंजिन कारखानदार आपल्या एंजिनांत मूळ भाग म्हणूनच बसवितात
किर्लोस्कर
ऑईल एंजिन्स् लिमिटेड,
पुणें - ३
TOM & BAY/KOE/M-






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

**माणसाच्या अंगावरून मोटार गेली हें ऐकल्यावर आईला फार बरं वाटलं.... वर्तमान पत्रांतून ती अशा बातम्या रोज वाचत होती... पण असलं डोळे मरून पहायला मिळत नाहीं याचें तिला वाईट वाटेल.... तें ऐकून तिला खूप आनंद झाला...**




**शाळेतून** आल्यावरोबर गोदीनें सांगितलं,

"आई, माणूस मेलाय्."

आईला जिवंत माणसापेक्षां मेलेल्या माणसाचंच जास्त कौतुक असे. आजुबाजूला कुणी मेलं कीं, तिच्या उत्साहाला उधाण येई. मग त्या 'मेल्याची' ओळख असो वा नसो. ती अगदीं स्वयंपाकांतून उठून त्याला बघायला जात असे. घरीं परत येते वेळीं तिचे डोळे आणि नाक लाल झालेलीं असत. त्या मृत माणसामुळें आजुबाजूचे वातावरण दसपटीनं जिवंत झालं आहे हें तिच्या वर्णनावरून कळत असे.

बाकी मेलेल्या माणसांची जिवंत वर्णनं हा आईच्या हातचा मळच होता. तिचीं वर्णनं ऐकून आजुबाजूच्या मंडळींना अगदीं भारावून गेल्यासारखं होई.

गोदीनं सांगितल्याबरोबर आईनं लगेच विचारलं,

"कुठं मेलाय् ग ?"

"शाळेजवळ."

"म्हणजे मास्तरबिस्तर असणार एखादा !" आईनं अंदाज व्यक्त केला.

मागें एकदां तिचा अशा प्रकारचा अंदाज बरोबर आल्यापासून तिला हे अंदाज करायची संवय लागली होती. 'दवाखान्याजवळ ना, म्हणजे नक्कीच कुणी डॉक्टर नर्स असणार', 'देवळाजवळ ना, म्हणजे पुजारीच असणार बहुतेक. आजारी होता, गेला असेल !', 'राजवाड्यांतलं कुणी गेलं ? म्हणजे आपले ते हे तर नसतील ?' अशा प्रकारचे तिचे अंदाज नेहमीं तयार असत. 'कशाजवळ कुणीतरी मेलं' एवढी बातमी आली कीं, फाडकन् अंदाज बोलून मोकळी व्हायची. अंदाज व्यक्त करूनहि तिचं समाधान होत नसे. मृताच्या घराची तिची काळजी सुरू होई. "सहा मुलं आहेत हो मागं—काय करावं आतां त्यांनीं—"

माणूस मेल्यावर त्याच्या मुलांनीं काय करावं याचं उत्तर आम्हाला ठाऊक होतं. मुलाचं कर्तव्य मुलं करतील याबद्दलहि आमची खात्री होती. सहापैकीं चार मुलांनीं जरी कर्तव्य बजावलं तरी पुरे आहे असं वाटण्यापर्यंत आमची मजल जाई. पण आईच्या बोलण्याचा अर्थ वेगळा असे——

"बरं हीं मुलंहि मोठीं असती तर प्रश्न नव्हता. पण इथून तियून सगळीं वर्षा-दोन वर्षांची."

अनंत तडवळकर

बोलतांना आईला भान राहत नसे. हिशेबांतहि ती कच्ची होती.

"आणि सहा मुलीहि आहेत ना ग आई त्यांना?" मी कुतुहुलपूर्ण प्रश्न विचारीत असे.

"होय रे—आणि इथून तिथून सगळ्या लग्नाच्या ! सोळा सोळा, सतरा सतरा वर्षाच्या."

आईचे पुन्हा हिशोबाकडे लक्ष नाहीं हें पाहून आम्हांला दुःख होई. आईला परत शाळेंत घालावेसें वाटे.

तरी पण आईच्या बिनहिशेबीपणाकडे फारसें लक्ष न देतां मी आणखी एका प्रश्नाचा विचार करीत असे. कुठल्याहि मृत व्यक्तीचीं मुलें लहानच कां असतात ? 'मुली मोठ्याच आणि लग्नाच्याच कां असतात ? त्याच्यामागें इतरांना 'आतां ह्यांचं कसं' ही काळजी कां पडावी ?

पण असले प्रश्नहि फारसे न काढतां आम्ही आईच्या चिंतेला पुरवण्या जोडींत असूं.

"नुसतीं मुलींचीं लग्नच नाहींत कांहीं आई ? सगळ्या मुलांच्या मुंजीहि आहेत म्हणे !"

"होय रे—काय करावं आतां त्यांनीं ?" आई डोळे किंवा नाक पुशीत म्हणे.

"एकूण सतरा माणसं होती म्हणे घरांत !"





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"होय रे—आतां सोळा राहिली." अधून मधून तिचा हिशेब बरोबर येई. अगदींच कांहीं ती 'ही' नव्हती.

. एवढी चर्चा झाल्यावर आणखी कांहीं बोलणं व्हायचं. त्या माणसाची कांहीं इस्टेट होती कां ? असल्यास किती व कशा प्रकारची ? त्या माणसानं विमा उतरवला होता कां ? असल्यास कितीचा ? सगळे हप्ते भरून तो मेला कीं, कांहीं हप्ते शिल्लक असतांना मेला ? सगळे हप्ते भरून मेला असेल तर फुकट मेला आणि हप्ते शिल्लक असतील तर माणूस घोरणी; मुत्सद्दी. त्याची प्रॉव्हिडंट फंडाची रक्कम होती काय ? असल्यास किती हजाराची ? (बास् इतकीच ?) मृत माणूस सेवानिवृत्त असल्यास फंडांतले किती पैसे खर्च झाले ? (हे पैसे खर्च करणं चांगलं कां ?) उरलेल्या रकमेंत मृत माणसाची घरमंडळी जिवंत राहूं शकतील काय ? त्यांनीं जगावें कीं मरावें ?

चर्चा इथंच संपायची नाहीं. तिला आणखी प्रगत स्वरूप येई. आतां त्या माणसाच्या बायकोनं नोकरी करावी कीं न करावी, मुलींना हुंडे न घेणारे नवरे (उधार) मिळूं शकतील काय ? (त्या स्वतःचें लग्न स्वतः जुळवूं शकतील काय ? तितक्या त्या धीट आहेत काय ?) मुलांनीं आपलें शिक्षण पुढें चालूं ठेवावें कीं न ठेवावें अशा अनेक प्रश्नांचाहि पोकळ विचार या चर्चेत येई.

चर्चेची अन्त्ययात्रा पुरी होईपर्यंत वाडयांतली चौकस मंडळी आई भोंवतीं गोळा होत असत. आई डोळयांत पाणी आणून (स्वतःच्या) त्यांचीं कुतुहलें भागवीत असे. परदेशी जाऊन आलेल्या माणसाला प्रश्न विचारावेत तसे प्रश्न ही मंडळी आईला विचारीत असत आणि आईहि भराभर उत्तरें देई.

नुसत्या अंदाजावर एवढं घडलं कीं, एखादा गणू सांगत येई.

"राधाकाकू, अंदाज चुकला तुमचा !"

"तो कसा रे ?"

"गणपतराव नाहीं वारले—त्यांचा बैल मेलाय्—"

"म्हणजे एकूण एकच कीं !" शोकाकुल आई म्हणे. पण लगेच तिला आपली चूक समजून येई.

"काय म्हणालास ?"

"गणपतराव नाहीं वारले. त्यांचा बैल मेलाय्."

"असं कसं असेल रे ?"

'गणपतराव जिवंत राहिले. आतां त्यांच्या घरमंडळींना काय करावं हा प्रश्न पडणार नाहीं. त्यांचा सतरा माणसांचा जंगीं संसार सुरळीत चालूं होईल' या आनंदापेक्षां आपला अंदाज चुकल्याचं तिला जास्त वाईट वाटे. पण लगेच ती गणपतरावाऐवजीं वारलेला (आणि हिशेब एकूण एकच असलेला, असा) बैल पाहून येई.

आल्यावरोबर तिचं वर्णन सुरूं होई. "असा मोठ्ठा होता हो—गेला—"

"कोण गेला ?" एखादा नवागत पृच्छा करी.

"बैल." आई सांगती होई.

तिनं केलेलं बैलाचं वर्णन ऐकतांना आजुबाजूच्या मंडळींना गणपतरावांचंच वर्णन ऐकत आहोंत असा भास होई. मंडळी भारावून जात असत.

मृत व्यक्ति जर स्त्री असेल तर आईच्या उत्साहाला पारावर राहत नसे. बायकांची गर्दी बाजूला सारून ती त्या मृत स्त्रीला पाहून येई. पाहून आली कीं वर्णन सुरू.

"गेली बिचारी ! सोस-सोस सोसलं पण मेली !" आतां बघून आलें तर अश्शी शांत पडलेली. हालचाल नाहीं. कांहीं नाहीं—आपली शांत—"

"सासूनं खूप छळलं म्हणे तिला !" दुसरं कुणीतरी.

"होय हो ! तिचं लग्न झालं ना, तेव्हांपासून सुरुवात झाली छळाला. बिचारी जेवणबिवण सगळं सासू समोर नाहीं बघूनच करायची. कधींमधीं शिरा खावासा वाटला—कुठं कांद्याची भजीं करून खावीं वाटलीं, तर तीहि सासू पुराणाला गेल्यावर !"



## सर्वांना जेव्हां जाग येते....

बायकोला जेव्हां जाग येते
तेव्हां
शरीराचा गेलेला असतो घाट....
आणि
नवऱ्याला जेव्हां जाग येते
तेव्हां
मुलं असतात आठ
पण
दोघांना जेव्हां जाग येते
तेव्हां
वय असतं साठ......

—प्रा. द. वि. संत

"आणि उसनं परत करायची हो आठवणीनं !"

"होऽ ! आणि लोकांकडे असलेलं उसनं परत कधीं मिळवायची ठाऊक आहे ? कुणी कसलं पीठ उसनं नेलं कीं, दोनचार दिवसांत तेंच पीठ स्वतः उसनं मागायला जाईल—बाकी संसारांत हें हवंच नाहीं ?"

"हो ना !"

"पहिल्या खेपेला जुळं झालं होतं ना हो तिला ?" इतिहाससंशोधनाचा आणखी एक प्रयत्न व्हायचा.

"जुळं नाहीं कांहीं. तिळं झालं पहिल्या खेपेस !" आई चूक दुरुस्त करीत असे, "जुळं झालं तें दुसऱ्या खेपेला. मग मात्र पुढं प्रत्येक वर्षीं आपलं सिंगल एक एकच मुलं होत गेलीं—" आणि विषय कुठल्या-कुठं जात असे.

सारांश, मृत व्यक्ति आणि भोंवतालचा 'ओलाचिंब' परिसर हा आईच्या जिव्हाळ्याचा विषय होता.

अनुक्रमणिका


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

## शिरीन....

मी विवाहित आहे हें कळूनही शिरीन माझ्या जवळ आली. तिला हवें होतें तें सारें तिनें मागितलें. माझ्या मर्यादा सांभाळून मीही दिलें पण....

कुठें तरी तें संपणार होतें. संपणेंच आवश्यक होतें. आणि....

तेंही घडलें—माझ्याच प्रयत्नानें. तें कसें घडलें तें मराठीतील सिद्धहस्त लेखक

**श्री. पु. भा. भावे**

यांच्या कथेंत वाचा.

**['दीपावली' दिवाळी अंक १९६५]**


म्हणूनच गोदीनं जेव्हां माणूस मेल्याचं सांगितलं तेव्हां तिनं लगेच चौकशी सुरू केली. शाळेजवळ मेलेला माणूस शिक्षकच असावा असा अंदाज तिनं व्यक्त केला आणि तो चुकीचा आहे असं समजूनहि तिला खरं वाटेना.

"शिक्षक नसेल तर शाळेंतला पट्टेवाला असेल." आईनं पुन्हां एक अंदाज फेकला.

"नाहीं ग, दुसराच कोणी आहे. आणि आई, गोदी पुढं सांगूं लागली, मोटार गेलीया अंगावर त्याच्या—"

"अग म्हणजे अपघात तो ! आधीं सांगूं नयेस ?"

माणसाच्या अंगावर मोटार गेली हें ऐकल्याबरोबर आईला फार बरं वाटलं. वर्तमानपत्रांतून ती रोज अपघाताच्या बातम्या वाचत असे. 'अंगावरून लोकल गेली, खड्डयांत धडपडून मृत्यू, 'घाटांत बस आदळली, 'ट्रामखालीं सांपडून एक ठार, बरेच जखमी' या बातम्या तिला रोज वाचायला मिळत असत. पण असलं कांहीं डोळे भरून पाहायला मिळत नाहीं याचं तिला वाईट वाटे. आपल्या गांवांत ट्राम नाहीं, लोकल नाहीं हा आपला अपराध झाला कां असं तिला वाटे. ट्रामचं राहूं दे. लोकलचे राहूं दे. त्यावावत आम्ही कमनशिवी आहोत हें खरं आहे. पण एखादी मोटार तरी गांवाजवळ खड्डयांत आदळावी ? गांवाबाहेर खड्डे कमी आहेत कां ? मी म्हणत्ये हें देखिल राहूं दे. पण निदान तिला एखादं विमान तरी गावांजवळ आदळावं ? कधींच कसं कांहीं पाहायला मिळत नाहीं ? माणसं नेहमीं आपली साधींच कशी मरतात ? असंहि तिला सारखं वाटतं असे.

म्हणूनच 'माणसावर मोटार गेली' हे गोदीचे शब्द ऐकून तिला खूप आनंद झाला. 'झाला बरं आपल्याकडंहि अपघात !' या छापाचं समाधान आईच्या चेहऱ्यावर झळकलं.

"केव्हां झाला ग अपघात ?" आईनें विचारलें.

"ठाऊक नाहीं."

"गर्दी झाली असेल नाहीं माणसांची ?"

"नाहीं ग. कुणी नाहीं—फक्त तो माणूस—"

"ड्रायव्हर असेल कीं !"

"नाहीं."

म्हणजे अपघात झाल्याचं फक्त एका ड्रायव्हरला ठाऊक आहे. पण तो तर तिथं नाहीं. कदाचित अपघाताची बातमी गावांत सांगण्यासाठीं तो—पण हें कसं शक्य आहे ? तो पळूनच गेला असेल. तसं असेल तर ही बातमी फक्त गोदीला आणि मलाच ठाऊक आहे असं वाटून आई हुरळली.

"शंभूऽ" तिनं मला हांक मारली.

माझ्या हातांत रहस्यकथा होती. खुनी इसम खून करून गेला होता. दोन तीन तासानंतर त्यानें प्रेतहि पळवलें होतें. खून झाल्याची मुख्य खूण म्हणजे प्रेत (खून झालेल्या माणसाचें) पण तें देखील पळवलें गेलें. खोलींत फक्त एकच साधन शिल्लक होतें. चघळलेलें सुपारीचें खांड. तेवढ्यावरून धनंजयांनीं तपास सुरू केला होता. आधीं त्यांनीं तें खांड स्वतः चघळून पाहिलें होते. नंतर छोटूला चघळायला दिलें होतें—एवढ्यांत आईची हांक आली होती. मी पाय आपटत गेलों

"काऽय ? राकेल आणायचं असेल—"

"नाहीं रे. तिकडे कुठें अपघात झालाया म्हणे. बघून ये—"

"पण नक्की झालाय कां ? कां आपला नेहमींसारखा तुझा अंदाज आहे ?"

"गोदी पाहून आलीय्—"

मी अपघाताची सगळी माहिती जमवली.

"गर्दी आहे कां तिथं ?" मी विचारलें.

"नाहीं—"

"म्हणजे दोन तीन तासांत प्रेत पळवलं जाणाचा संभव आहे—"

थोडा विचार करून आईला म्हणालों,

"आई, आपण पोलिसांना मदत केली पाहिजे—"

"करूं कीं !"

"आतां इथून जाऊन तो अपघात पाहून येऊन पोलिसांना पळवायच्या आंत—"

"पोलिसांना कशाला पळवायचं ?"

"पोलिसांना कळवायचं म्हणत होतों—"

"बरं पुढें ?"

"तर पोलिसांना कळवायच्या आंत जर प्रेत पळवलं गेलं—"

"पण मी म्हणत्यें पोलिसांना प्रेत पळवायचं कारणच काय ?"

"तूं ऐकून घे पूर्ण." मी चिडून बोललों—"अग पोलिसांना कळवायच्या आंत जर प्रेत पळवलं गेलं तर कांहीं उपयोग आहे कां ? तपास लागेल कां ? नाहीं. म्हणून माझा विचार असा कीं, तें प्रेत तिथून नाहींसं होण्याआधीं आपण हमाल करून इकडं आणायचं."

"तसलं नको बाबा अघोरी कांहीं-तरी !"

"मग आपल्या हालचालीचा उपयोग काय ? आणि आई, या मदतीचा एक फायदा होईल—बक्षीस मिळेल आपल्याला."

"बक्षीस ? . . . बरं होईल बाबा मिळालं तर. रेशनहि आणायचं आहे—"






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



‘ माझ्या
कांतिसौंदर्याचं श्रेय लक्सलाच!’
–शर्मिला टागोर

आपलीहि कांति शर्मिला टागोर हिच्या कांतीइतकीच महत्त्वाची...आपल्याहि कांतीची निगा तशीच राखायला हवी!..

सौंदर्यवती शर्मिला म्हणते, ‘सतेज, निर्व्यंग कांति ही खीला मोठ्या अभिमानाची गोष्ट वाटत असते. म्हणूनच मी म्हणतें, आपल्यालाहि आपल्या कांतीबद्दलं माझ्या इतकंच महत्त्व वाटत असणार. आपणहि माझ्याचप्रमाणं लक्स वापरा. माझ्या रोजच्या सौंदर्यनिगेंत त्याला महत्त्वाचं स्थान आहे. लक्सचा मृदुमृदुल फेस किती सौम्य... आणि किती मधुर सुवासिक! आपल्याहि सौंदर्यसाधनेसाठीं लक्सचाच उपयोग करा!




शुभ्र व इंद्रधनुष्याच्या चार रंगांत

लक्स टॉयलेट साबण सिनेतारकांचा शुद्ध सौम्य सौंदर्यसाबण

हिंदुस्तान लीव्हरचें उत्पादन

[illegible]—LTS. 191-140 MA








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

"तुला आपलं रेशनचं लागलेलं असतं नेहमीं. आणि आई, यांतले पैसे तुला मिळणार नाहींत हं. सांगून ठेवतों. कधींचा एक सूट शिवीन म्हणत होतों.–"

"अरे पण किती मिळणार आहे बक्षीस ?"

"मिळाले तर शंभर रुपये मिळतील. नाहींतर हजारहि मिळतील—"

"हजार रुपये ?"

"हो."

इतका वेळ कशाचाच पत्ता नसणारे वडील एकदम जागे झाले.

"कुठे आहेत ते पैसे ? आण इकडं." ते गरजले.

"पैसे अजून मिळाले नाहींत अण्णा. मिळतील बहुतेक."

मी वडिलांना सगळें समजावून सांगितलें.

"पण प्रेत पळवलं जाईलच कशावरून ?" वडील विचारूं लागले.

"कदाचित् जाणारहि नाहीं. पण अण्णा, तसं करणं ही देखिल पोलिसांना मदतच नाहीं कां ?"

"तें इकडं आणण्यापेक्षां आपणच तिथें राखण म्हणून बसलों तर ?"

"बसूं हवं तर—पण—"

"बरं तूं म्हणतोस तसंच करूं. पण बक्षीस मिळेल ना ? मिळणार असेल तर वाटेल तें करायला आपली तयारी आहे. कधींपासून तें लायसन् काढावं म्हणत होतों—"

"मी जाऊं मग ?"

"मीहि येतों कीं ! . .वडील म्हणाले. कदाचित् बक्षीस घेऊन मी पळून जाईन असं वाटत असावं त्यांना.

"तुम्ही जाणार ?" आईनं विचारलं.

"होय. कां ?"

"शंभू म्हणत होता कीं, हमाल करून तें प्रेत इथें आणावं—पण आतां तुम्ही जर जाणार आहांत तर हमाल कशाला करायचा म्हणत होते—"

"म्हणजे मी आणू होय तें प्रेत ?"

"त्यांत काय झालं ? वेताळ पंचविशींतला राजा गोपीचंद—"

**सावित्री....**

**एक होता पाटील**
**त्याला होती बायको**
**बायको खूप खूप नटायची....**
**नाटकांत काम करायची**
**सावित्रीची भूमिका करून**
**यमाबरोबर फिरायची....**

**तारामती....**

**सोज्वलता, शुद्धि-शांती**
**यांनी युक्त तारामती....**
**शुद्ध वैदिक पद्धतीने—**
**—केले तिने सात पती......**

–प्रा. वि. द. संत

"गोपीचंद नव्हे. विक्रमादित्य" वडिलांनीं चूक दुरुस्त करण्यांतहि चूक केली.

"विक्रमादित्य नव्हे अण्णा, विक्रमार्क." दुरुस्तकर्ता मी.

"तर मी म्हणत होते, विक्रमार्कानं नव्हतं कां प्रेत खांद्यावरून आणलं ?" आईनं म्हटलं.

वडिलांनीं थोडा विचार केला. स्वतःची तुलना विक्रमार्काबरोबर केली आणि म्हटलें,

"बरं आहे चला. हजार रुपये हमाली मिळणार आहे—करूंया तेंहि. पण हें बघ, आम्ही येईपर्यंत चहा करून ठेव हं थोडा—" आणि ते पुढें म्हणाले, "दोघांचाच कर. त्या पाहुण्याला कांहीं लागणार नाहीं—" चला शंभूदेव."

चार पावलं चालून गेल्यावर ते पुन्हां म्हणाले,

"पण बक्षीस नक्की मिळणार ना शंभ्या ? कीं आपण हें कांहीं दळभद्री करत आहोंत ?"

आईचाहि विचार बदलला.

"होय शंभ्या, तसलं कांहीं अघोचर नकोच बाबा. दुसऱ्याचं प्रेत घरीं आणणं म्हणजे कससंच वाटतं—आपलं असतं तर गोष्ट वेगळी होती—"

मलाहि त्यांत विचित्रच वाटायला लागलं. पोलिसांना अशा प्रकारें मदत केल्याचं उदाहरण मी कुठं वाचल्याचं मला आठवेना. अशी मदत केल्यानं बक्षीस मिळेल असंहि वाटेना. फक्त त्यांना हवा असणारा माणूस शोधून दिला तर बक्षीस मिळेल, मागं 'आपल्या वडिलांना शोधून देणाऱ्यासाठीं असं बक्षीस लावलं होतं हेंहि माझ्या डोक्यांत आलं. पण तेवढ्यांत मला आणखी एक कल्पना सुचली.

"नाहीं तर आपण असं करूं ?"

"कसं ?"

"आपण फिंगरप्रिंटस् घेऊं ड्रायव्हरच्या. म्हणजे पोलिसांनाहि मदत होईल—"

"बक्षिसाचं काय पण ?" वडिलांना इतर बाबतींत फार रस नव्हता.

"मिळेल बहुतेक."

"मग नुसत्या ड्रायव्हरच्या फिंगरप्रिंटस् कशाला घ्यायच्या ? गाडीच्या चाकाच्याहि घेऊं—" वडील म्हणाले.

मला हंसावें कीं रडावें हें कळेना.

मग पोलिसांना मदत करण्याचे सगळे प्रकार रद्द करून मी बोललो,

"आधीं मी नुसता अपघात तरी पाहून येतो—कारण असल्या क्षुल्लक गोष्टींसाठीं बक्षीस मिळेल असं वाटत नाहीं—"

शेवटचे चार पांच शब्द ऐकल्याबरोबर वडिलांनीं कपडे उतरवले आणि ते नेहमींप्रमाणें कॉटवर 'घोरायमान' झाले.

मी एकटाच अपघात पाहाण्यास निघालों. धांवता धांवता पायजम्यांत पाय 'जमा झाल्यामुळें' दोन तीनदां पडलों. पण पुन्हां उठून शाळेजवळ पोहोंचलों.

शाळेजवळ मोटार होती. मोटारीखालीं माणूस होता. बरं वाटलं—आणखी पुढें गेलों आणि पाहिलं. मोटारीखालीं माणूस होता. शांतपणें मोटार दुरुस्त करीत होता.

•••



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# पानपुरी

चुरचुरीत, खुसखुशीत आणि खमंग फरसाण

## पुन्हां एकदां—

"आज मला जज्ज-साहेबांच्या पुन्हां एकदां एक मुस्कटांत मारावी असं वाटलं होतं," केस हरलेला वकील दुसऱ्या वकिलास म्हणाला.

"पुन्हां एकदां ?" दुसऱ्या वकिलानें विचारलें.

"हो. पुन्हां एकदां," वकील साहेब उत्तरले. "गेल्या आठवडयांत सुद्धां एकदां मला तसं वाटलं होतं." ●●●

## कसली लहान ?

"सायेब," म्हातारी जज्ज-साहेबांना म्हणाली, "माज्या नातीचं लगीन करायाचं हाये. तुमची परवाणगी हवी हाये. वयाचा परस्न हाये."

"किती वय आहे तुझ्या नातीचं ?"

"पंदरा."

"पंधरा ? पण बाई, कायद्याच्या दृष्टीनें पाहिलं तर लग्नाच्या दृष्टीनें ती अजून लहान आहे."

"तें खरं, सायेब," म्हातारी डोळ्यांत पाणी आणून म्हणाली, "पन ती ज्ये काई करूण बसली हाये, त्ये करन्याइतकी ती म्होटी झालेली हाये, त्याला मी काय करूं ?" ●●●

## उगी, उगी—

"यापूर्वी कधीं तूं तुरुंगांत गेलेला आहेस ?" न्यायाधीशांनीं विचारलें.

आरोपीच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले.

"न्हाई, सायेब," तो म्हणाला, "कदीच न्हाअी."

"उगी, उगी, रडूं नकोस," न्यायाधीश म्हणाले, "आपण पाठवूं हं तुला आतां."

## मलाही माहीत नाहीं—

एका खेडेगांवांतील कोर्टांत एक खटला चालला होता. दोन्ही पक्षांची सुनावणी झाल्यानंतर न्यायाधीश साहेब ज्यूरीला म्हणाले,

"दोन्ही बाजूं तुम्ही ऐकल्या आहेत. फिर्यादी खरं बोलत आहे असं तुम्हांला वाटलं तर तुम्ही त्याच्या बाजूनें निकाल द्या. आरोपी खरं बोलत आहे असं तुम्हांला वाटलं तर तुम्ही त्याच्या बाजूनें निकाल द्या."

मग त्यांनी एकदां घसा साफ केला आणि ते पुढें म्हणाले,

"पण—दोघेहि बेमालूम थापा मारीत आहेत असं माझ्या-प्रमाणेंच तुम्हांलाहि वाटत असेल, तर मात्र तुम्हीं काय करायचं तें मला स्वतःलासुद्धां माहीत नाहीं." ●●●

## एकच नाहीं ! — बारा !

ज्यूरीमध्यें सर्व स्त्रियाच होत्या.

"चोवीस तासांत तुम्हांला कुठलाहि निर्णय घेतां आला नाहीं ?" न्यायाधीशांनीं विचारलें.

"आम्ही एकूण बारा निर्णय घेतले आहेत, युवर ऑनर," फोअरमन म्हणाली. ●●●

## मी इथें आहे !!

"तुमच्यासारखा गाढव या कोर्टांत दुसरा कुणी नसेल !" आरोपीचे वकील भडकून फिर्यादीच्या वकिलांना म्हणाले.

"हां, हां," न्यायाधीश टेबलावर मूठ आपटून म्हणाले, "मी इथें आहे हें विसरूं नका." ●●●

## भलतीच कमाल

फिर्यादीच्या वकिलानें आपलें बोलणें संपविलें होतें. आरोपीचे वकील आतां बोलण्यास उभे राहिले. पण जज्ज-साहेबांनीं त्यांना अडविलें. फिर्यादीच्या वकिलाच्या कौशल्याबद्दल आश्चर्य आणि कौतुक त्यांच्या नजरेंत स्पष्ट दिसत होतें.

"आरोपीनें कांहीं बोलण्याची आवश्यकता नाहीं," तें म्हणाले. "फिर्यादीचा विजय झाला आहे."

"पण युवर ऑनर," आरोपीचे वकील म्हणाले, "निदान मला आपलं म्हणणं तरी पुढें मांडूं द्या."

"ठीक आहे, बोला." जज्ज-साहेब कंटाळलेल्या स्वरांत म्हणाले.

आरोपीचे वकील बोलूं लागले. त्यांचें बोलून संपलें तेव्हां जज्ज-साहेबांच्या नजरेंत जास्तच आश्चर्य आणि कौतुक दिसत होतें.

"काय कमाल आहे." ते म्हणाले. "आतां आरोपीचा विजय झाला आहे."

—वि. रा. भाटकर

## आधीं पळविलें !!

एका तरुणीला फूस लावून पळवून नेल्याच्या आरोपावरून एका तरुणाला पोलीसांनीं कोर्टासमोर हजर केले. तरुणी साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत उभी होती. प्राथमिक चौकशीच्या अवस्थेंत ही तक्रार होती. ती तरुणी गडबडून जाऊं नये यासाठीं शिरस्तेदारानें कोर्टाच्या हुकुमावरून खुलासेवार प्रश्न केला, "हे बघ मुली ! यानें तुला फूस लावली नि मग पळवून नेलं, हें खरं कीं नाहीं ?"

त्या तरुणीचा काय समज झाला कोणास ठाऊक. ती लाजली; मग लाजत लाजत उत्तरली, "आधीं पळवून नेलं."

कोर्टांत हंशा झाल्यामुळें ती अधिकच लाजून लाल झाली.

—ॲड. यशवंत गोविलकर



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



—प्रा. उत्तम शिरवळकर

**"मला मंदा साठे नको, फक्त सुमित्राच हवी आहे. तिच्या कुबड्यांसकट !" असा एक आगळा शोध लागतो— —पण फार उशिरां !**



**टेनिस** रॅकेट हातांत घेऊन मी मोठ्या उत्साहानें घराबाहेर पडतो. खेळण्यासाठीं—विशेषत: मंदा साठेच्या धुंद सहवासासाठीं—माझं मन आतुर झालेलं असतं. तोच माझं लक्ष तिच्याकडे जातं. नेहमींप्रमाणें ती खिडकींत उभी असते. काळा सांवळा वर्ण, अपरं नाक आणि अत्यंत तेजस्वी डोळे ! नेहमींप्रमाणें तिची नजर प्रथम माझ्या पांढऱ्या शुभ्र कॅनव्हास शूवर जाते आणि हळुंहळूं माझ्या चेहऱ्यापर्यंत सरकते. डोळ्यांत डोळे मिळतात. त्या डोळ्यांतली खिन्न झाक माझ्याहि मनावर चढते. शीळ घालण्यासाठीं तयार झालेली माझ्या ओठांची मुडप तशीच राहते. रंगेल गाण्याची ओळ घशांतल्या घशांत विरते. उत्साह कुठल्या कुठें विरून जातो. मनाची अस्वस्थता लपविण्यासाठीं मी हातांतली रॅकेट हवेतल्या हवेत फिरवतो. ती चपापते आणि पटकन घरांत निघून जाते. तिच्या नसण्यामुळें भिंतीवरील पार्लेचं कॅलेंडर मला दिसतं. ते जणूं मला वेडावीत असतं.

मीहीं पुढेंचालूं लागतो. पण उत्साहाची भट्टी आतां बरोबर साधत नाहीं. उदास उदास वाटतं. मनाला खिन्नतेची छटा अधिकच विलगूं लागते. मीं माझ्या मनाची उलटतपासणी करतो. नाना तऱ्हेचे तऱ्हेवाईक, प्रेमळ, कठोर असे प्रश्न विचारतो. अगदीं कसलेल्या वकिलाप्रमाणें. पण निष्पन्न कांहीं होत नाहीं. तिच्या नजरेंतील खिन्नतेचा संसर्ग मला कां व्हावा हें समजत नाहीं. तिच्यावर माझं प्रेम तर नसेल ? छे, छे ! सपशेल चूक.

कोर्टवर माझं खेळण्यांत मुळींच लक्ष नसतं. मी वेंधळ्यासारखा वाटेल तसे फटके मारीत सुटतो. मंदा साठे आपल्या कुरळ्या बटा सांवरीत मला कोपरखळी मारते, "ए, तुझं लक्ष नाहीं हं खेळण्याकडे." मी बावळटासारखा हंसतो. मंदाची गोरीपान आकृति माझ्या डोळ्यांपुढें कथ्थक सुरूं करते. तिच्या कुरळ्या बटा माझ्या डोळ्यांतून आरपार शिरतात आणि बधीर वेदनांवर गुदगुल्या करतात. मला गालिबचा एक शेर आठवतो. मी जोरांत खदखदून हंसतो सगळे चमकून माझ्याकडे पाहतात. पण मला आतां गालिबचा शेर चढूं लागतो. मी हळुंहळूं रंगूं लागतो. बेभानपणें खेळूं लागतो. खेळाला भलताच रंग चढतो.

हा सहजासहजीं हातांत सांपडलेला मूड मला सोडायचा नसतो. हातांतली रॅकेट मजेत फिरवीत मीं बाहेरच्या उद्यानांत फिरू लागतो. मला शोधत मंदा बाहेर पडते. तिला पाहतांच गालिबचा शेर माझ्या डोळ्यांत उतरतो. माझ्या रोखल्या दृष्टीनें गोरी गोरी मंदा लाल लाल होते. वाऱ्यानें उडणाऱ्या तिच्या कुरळ्या बटा मला खुणावूं लागतात. ती माझ्याजवळ येते. पण मी तिच्याजवळ नसतोच. मी अंतराळांत दूर दूर





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट


अनुक्रमणिका

पोहोंचलेला असतो. एका अनोख्या जगांत. तिथें असते फक्त मंदा–तिच्या कुरळया कुरळया बटा आणि गालिबचा शेर !

'ए, कुठें लक्षय् ? आम्हीं आलोत ना !,' मंदाच्या लाडिक स्वरांनीं मी भानावर येतो. तिला हलकेंच जवळ ओढतो. मांजरीसारखी गुरगुर करीत ती माझ्या मिठींत शिरते.

रंगेल गाण्याची शीळ घालीत रात्रीं मी घरीं येऊं लागतो. मंदाच्या स्पर्शाची जादू रोमरोमांत उसळत असते. माझं मन चंद्राभोंवती पडणाऱ्या खळ्याप्रमाणें मंदाभोंवती भिरभरत असतं. घरापाशीं येतांच अचानक माझे लक्ष समोरच्या खिडकीकडे जातं. ती माझ्यावर नजर रोखून खिडकींत उभीच असते. तिची आर्त नजर प्रथम माझ्या पांढऱ्याशुभ्र कॅनव्हास शूवर जाते आणि हळुंहळूं माझ्या चेहऱ्यावर खिळते. त्या नजरेतली आर्तता माझ्या अंतःकरणांत रुतते. माझ्या उत्साहाचे निर्माल्य होते. रंगेल गाण्याची ओळ घशांतच विरते. मी अत्यंत असहाय्य होतो. तिच्याबद्दलचा तीव्र संताप माझ्या मनांत उफाळून येतो. माझ्या नजरेंतले भाव पाहून ती विजेचा धक्का बसावा तशी चमकते आणि क्षणांत खिडकींतून दूर होते. भिंतीवरील पार्लेचं कॅलेंडर चमकतं. १९६४ चा तांबडा लाल आंकडा फडफडतो. तिच्या या अदृश्य जाचाला दोन वर्षं पुरी होत असल्याचं माझ्या लक्षांत येतं.

दोन वर्षं ! दोन वर्षांपूर्वी ते बिऱ्हाड आमच्या घरासमोर राहायला येतं. मी सहज दारांत उभा असतो. टॅक्सींतून ती चार माणसं खालीं उतरतात. तिला तिच्या आईनें आधार दिलेला असतो. त्याचवेळीं तिचं लक्ष माझ्याकडे जातं. तिच्या डोळ्यांत ती विलक्षण आर्त चमक दिसते. मी उगीचच शहारतो. तिला काय करावं तें समजत नाहीं. तिचे आईवडील तिला कांहीं तरी सांगत असतात. पण ती हरवल्यासारखी उभीच असते. वडील टॅक्सीचे बिल देतात. त्यांच्या व माझ्यामध्यें पसरलेली टॅक्सी भुर्रकन् निघून जाते, आणि मला समोरचे ते दृश्य दिसते. अत्यंत शरमून जाऊन ती आईच्या हातांतील आपल्या कुबड्या घेते व मुळींच मागें न पाहतां आपला थोटा पाय खुरडत चालूं लागते. तिला कुबड्यांच्या सहाय्यानें चालतांना पाहून माझें मन अतीव करुणेनें भरून येतं.

आणि मग त्या करुणेतच मी वाहवत जातो. एखाद्याला दारूचं व्यसन लागावं तसं तिच्या डोळ्यांतील आर्ततेत बुडून जाण्याचं मला व्यसनच लागतं. मी केव्हांही बाहेर पडूं लागलों किंवा घरीं येऊं लागलों तरी ती त्या खिडकींत दिसूं लागते. दिवसेंदिवस तिच्या तेजस्वी डोळ्यांतील ती खिन्न छटा गडद होत जाते. मला झाकळून टाकूं लागते.

हळुं हळूं आमच्या घरांत तिची चांगली ओळख होते. प्रत्येकजण तिच्याबद्दलच्या करुणेनें बोलत असतो. तिच्या कविता प्रसिद्ध झालेली मासिके आमच्याकडे येऊं लागतात. त्या ओळी ओळींतली आर्तता मला जर्जर करून टाकते. एक दिवस मी सरळ तिच्या खोलींत शिरतो. मला पाहतांच ती बावरते. कुबड्या घेण्यासाठीं धडपडते. तिचा तोल जातो. मी तिला माझ्या बाहूंत सांवरतो. तिची दुबळी काया थरथरत असते. डोळ्यांच्या कडांवर पाणी जमा झालेलं असतं. माझं मन अनुकंपेनं भरून येतं. नकळत मी तिला छातीशी धरतो. तिला हुंदका आवरतां येत नाहीं. तिच्या अश्रूंनीं माझा शर्ट ओलाचिंब होतो.

एकाएकीं दचकून मी तिला बाजूला सारतो. अनुकंपेच्या आहारीं जाऊन आपल्या हातून भलताच प्रकार घडला याबद्दल मी मनांतल्या मनांत स्वतःला दोष देऊं लागतो. खुर्चीला लावून ठेवलेल्या कुबड्या माझ्या मस्तकांत आघात करतात आणि अत्यंत वेगानें मी तिच्या खोलींतून बाहेर पडतो.

त्यानंतर आजपर्यंत तिच्या खोलींत मी पायही ठेवलेला नसतो. वाऱ्याची झुळुक यावी तशी मंदा साठे माझ्या जीवनांत येते. तिच्या गोऱ्यापान रंगात आणि काळ्या कुरळ्या बटांत मी पुरता गुरफटून गेलेला असतो. सुखाचा प्याला माझ्या ओठाशीं असतो. पण त्यांत कुठें-तरी कांहींतरी कमी असतं. मंदाच्या संगतींत असेपर्यंत मी जगाला विसरून जातो. पण ती नसतांना मात्र सुमित्रेच्या आर्त नजरेच्या आवर्तांत सांपडतो. त्यावेळीं मला मंदाचीही आठवण होत नाहीं. ही अशी ससेहोलपट दोन वर्षं चालूं असते. माझें मलाच कांहीं उमगत नसतं.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

त्या रात्रीं मी अंथरुणावर तळमळत असतो. तिच्याकडे मी रागाची दृष्टी टाकताच तिच्या नजरेंत पेटलेली आर्तता मला चैन पडूं देत नाहीं. मला वाटतं. तिच्या आर्ततेच्या लाटेंत मी बुडून जात आहे. माझ्या मनांतलीं अनुकंपा उग्र रूप धारण करते. अंत:करणांत उठ-लेल्या लाटा मला असह्य होतात. क्षणांत मंदाचा गोरापान चेहरा माझ्या डोळ्यां-पुढें चमकतो. तोंच सुमित्राचे ते तेजस्वी आणि आर्ततेची आग ओकणारे डोळे प्रचंड रूप घेऊन माझ्या डोळ्यांसमोर येतात. त्या डोळ्यांतली खिन्नता दूर व्हावी अशी मला तीव्र इच्छा होते. सुमित्राच्या त्या कुवड्या मला आतां भेडसावूं शकत नाहींत. मंदाची आकृति मला आतां लोभावूं शकत नाहीं. त्या डोळ्यांतली खिन्नता दूर करण्याकरितां मी साऱ्या पृथ्वीला आग लावायला तयार होतो. मला फक्त सुमित्राच हवी असते. तिच्या त्या कुवड्यांसकट ! हा आगळा शोध लागतांच माझ्या मनावरील फार मोठें दडपण दूर होते. सुमित्राचे सदैव व्याकुळ डोळे हंसतांना कसे दिस-तील याचा विचार करतां करतांच मला गाढ झोंप लागते.

सकाळीं कसल्यातरी गलक्यानें मी जागा होतो. रस्त्यावर कसला तरी आरडा ओरडा चाललेला असतो. मी शांतपणें खिडकीशीं येतो. आणि माझं लक्ष रस्त्याकडे जातं. रस्त्यावर रक्ताच्या थारोळ्यांत सुमित्रेचा निष्प्राण देह पड-लेला असतो. आज आयुष्यांत प्रथमच तिच्या शेजारीं त्या कुवड्या नसतात. माझं लक्ष तिच्या चेहऱ्याकडे जातं. तिचे सताड उघडे डोळे माझ्या खिडकी-कडेच लागलेले मला दिसतात. त्या निष्प्राण डोळ्यांतहि मला ती खिन्नतेची आग धुमसतांना दिसते. आणि माझ्या हृदयांत एक दाहक कळ उठते. मी अवाक् होतो. माझ्या डोळ्यांत ती खिन्नतेची चमक दिसूं लागते. सुमित्रेची—माझ्या सुमित्रेची—आठवण म्हणून ती आतां कायमची माझ्या डोळ्यांत राहणार असते. ● ● ●

---


# प्रसिद्ध होणार! प्रसिद्ध झाला!! संपला!!!

## गेल्या वर्षीचें हें सत्यकथन

## वार्षिक दीपावली १९६५

साहित्य-कला-सङ्गम

**गेल्या वर्षी अंक प्रसिद्ध होतांच हातोहात संपला! पुष्कळांची निराशा झाली. अनेकांनीं तक्रारी केल्या त्यांच्यासाठीं मुद्दाम हा खुलासा करीत आहोंत.**

**मुंबईतील विक्रेत्यांनी मुंबईचे सोल एजंट मे. बाबूराव बागवे यांच्याकडे दि. २५ सप्टेंबरपर्यंत आगाऊ नोंदणी करावी. त्यांनाच यंदाचा अंक निश्चित मिळेल. प्रति मोजक्याच असल्यानें यानंतरची मागणी पुरी करणें शक्य होणार नाहीं.**

**किं. ३॥ रु.** **पृष्ठें २२५ वर**

**६ अनेकरंगी चित्रें व १६ पानांची दुरंगी बेफाम व्यंगचित्रमाला**


अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# झेपावणारी 'क्षिप्रा' व रेंगाळणारी 'सरहद्द'




• क्षिप्रा आणि सरहद्द •

"बाराची तोफ ! जगांत यायची भलती वेळ शोधली बेट्यानं !" विशूच्या जन्मकाळीं त्याच्या वडीलांनी—बापूंनीच काढलेल्या उद्गारांनीं विश्वासच्या भावी आयुष्याची परवड सूचित केली आहे.

विश्वास नारायण वीरकर ह्याच्या जन्मापासून तो पित्याच्या मृत्युनंतर पुढील शिक्षणासाठीं परगांवीं आश्रयाला निघण्यापर्यंतचा कालखंड '**क्षिप्रा**'मध्यें ग्रथित केलेला आहे. तर '**सरहद्द**' मध्यें त्या ठिकाणीं कांहीं काळ कंठून उन्हाळ्याच्या सुटीत परत आपल्या गांवी येईपर्यंतची वाटचाल नंतर 'सरहद्द' मध्यें चित्रित केली आहे. पण क्षिप्रेत बाकीच्या व्यक्तींनी त्याला मागे हटविले आहे असें म्हणावे लागते. '**क्षिप्रा**' वाचतांना सतत मधु आठवतो. मधू विशूचा मोठा भाऊ. उद्रेकानें सतत धुमसणारा. आजुबाजूच्या कक्षांचे साखळदंड सहन न होणारा, झुंझार व आक्रमक वृत्तीचा मधुकर नारायण वीरकर हाच डोळ्यांत भरतो.

चित्रित केली आहे.

विशूच्या जन्मापासूनच त्याला प्रतिकूल परिस्थितीत जगावें लागले आहे. हलाखीच्या स्थितीतही नेकीनें जगण्याचा प्रयत्न करणारे वामनरावासारख्या स्नेह्याकडूनहि अडचणीच्या वेळीहि मंदतीचा हात घेतांना पिळवटलें जाणारे, स्वतःच्या चांगुलपणावरून जगालाहि चांगल्या तराजूत जोखणारे आणि विशूचे आदर्श असलेले बापू, हाताखालच्या कुलकर्णी नांवाच्या कारकुनाने केलेल्या अफरातफरीमुळें अधिकच गोत्यांत येतात. आधीचेच फाटकें आभाळ अधिक चिरलें जातें आणि वीरकर कुटुंबावर लवकरच कोसळणाऱ्या आकाशींच्या कुऱ्हाडीत्री सूचना पक्की केली जाते.

विरोधी व्यक्तिरेखेच्या जोडचा '**क्षिप्रा**' फार समर्थपणें सादर करते. काव्यवेश, आडदांड, मुक्त आणि जिद्दी मधुकर तर त्याचा पिवळट, फिक्कट, गंभीर आणि अबोलक्यानं भार वाहणारा मित्र भावे, मधू आणि तोतरा, कंजूष, विक्षिप्त म्हातारा बाबासाहेब, मधू आणि तांबारलेल्या डोळ्यांचा आडदांड तहसीलदार, बिशू आणि चिंतू वझे ह्या साऱ्या विरोधी उटावांतून '**क्षिप्रा**' गतिमान होतांना आढळतें.

दोन्हीं कादंबऱ्यांचा नायक विशू आहे. किंवा विशूची पौगंडावस्था 'क्षिप्रा'-

बापूंच्या मृत्युनंतर बर्मा फ्रंटवर निघालेल्या मधुची मनिऑर्डर येते, विशू देवाजवळ धरणें धरून बसतो. मृत्यूची छाया अधिक गडद होते.

"जगायचं असेल तर कमअस्सल धातू मनांतहि मिसळावे लागतात." हें वामनरावांचें व्यवहारी तत्वज्ञान, आणि "आज हरेकाला धावायची मुभा आहे. धावायचे नि पुढं जायची. पुढं जायची नि धावायची. आड येणाराला कापून काढायची. . . ." हें बापूंना फसवणाऱ्या कुलकर्णीचें कुणाला पटो वा न पटो रोखठोक तत्वज्ञान आणि "विश्वासावर . . भरवंशावर सारं जग चाललंय. . . ." असें त्रेतायुगीन श्रद्धाकेंद्र बाळगणारे सरळमार्गी बापू ह्या परस्परविसंवादी विचारधारांनी क्षिप्रेला प्रवाहीत केले आहे. अवेळी जन्माला आलेला, वडीलांचे छत्र व भावाचा आधार हरवलेला विशू लोकांच्या आश्रयाला जातो. कुणी अनोळखी चेहरा त्याला शोधणार असतो. भावेच्या शब्दांची सोबत आणि प्रचिती घेत विशू गांव सोडतो. '**क्षिप्रा**' इथे थबकते.

'**सरहद्द**' हें विशूच्या आयुष्याचें पुढलें वळण. एकांगी, अधुरें पण तरी कांहीं श्रद्धास्थानांचें वाण घेऊन विशू नव्या माणसांत मिसळतो. आईच्या मायेचे बंध दूर सारून मावशीच्या विश्वांत तो रमण्याचा यत्न करतो. इथें सगळें कांचेसारखें—चित्रासारखें चकचकीत आहे. तिथली मुलें मुलांसारखीच वाढलेली आहेत. विशूची अकाल प्रौढावस्था मावशीच्या नकली जीवनमूल्यांशीं एकजीव होऊं शकत नाहीं. तो समवयस्क कमळीलाहि, "मला तुझं गाणं आवडत नाहीं!" असे रोखठोख सांगतो. इतकें प्रामाणिक मत असलेल्या माणसाच्या दर्शनानें ती हबकून जाते. मिस्टर पाध्यांच्या आणि मावशीच्या भारतांतील चळवळीवरील संभाषणांत विशू आपलें मत विलक्षण हिरीरीनें मांडतो. मावशीच्या लांबच्या नात्यांत व म्हणून संपर्कांत येणारे नाना, त्यांची आक्रस्ताळी पत्नी, राजा, बंड्या, आणि क्षयानें बिछान्याला टोंचून राहिलेली अक्का ह्या मंडळींत विशूला हरवल्यासारखें वाटतें. क्षिप्रेमध्यें रविंद्रनाथांच्या कवितेंत हरवणारा, एकांगी, पहिलवानी घाटाचा उमदा मधुकर बिशूच्या सोबत वावरतो तर '**सरहद्द**'मध्यें कविता लिहिणारा, आपल्या मस्तीत मरण्याची इच्छा बाळगणारा, थंडीपासून बचाव करण्यासाठीं म्हणून भंग्यानें पेटवून दिलेल्या ढिगाऱ्याच्या गरम राखेंत गुडघ्यापर्यंत पाय शेकणारा. . . .काळ्याभोर तोंडावर ताणून बसविलेली त्वचा, चेहऱ्यावरील हाडाचा प्रत्येक उंचवटा चमकत असलेला, फेंदारलेल्या नाकाखालीं फुटलेली मिसरूड आणि खांद्याचे उंचवटे दर्शविणारा जीर्ण शर्ट घालून सतत बेदरकार तुच्छतेने वावरणारा, राजा विशूला भेटतो.








अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

ज्या ज्या ठिकाणीं विशू आपलें आपुलकीचें केंद्र शोधूं पाहतो, तिथें तो असफल ठरतो. स्वतःच्या घरीं सख्ख्या भावाशीं, मावशीकडे सगळ्यांशींच त्याचें पटत नाहीं म्हणून तो गीताबाईकडे जातो. तिथें गांजेकस नाना, फटकळ गीताबाई ह्यांच्या दर्शनानें त्याच्या शोधाला तडा जातो. विसाव्याचें स्थान म्हणून अक्का भेटते न भेटते तो ति.ा मृत्यू त्याचें समाधान हिरावून घेतो.

आजुबाजूचे वातावरण ह्याच वेळीं तापूं लागते. कादंबरीला ह्याच वेळी राजकीय पार्श्व लाभतो. आजुबाजूचे सर्व वातावरणच सहानुभूतिशून्य असते. गोळीबार, लाठीमार, मिरवणुका, गुप्तता, आरोळ्या ह्यांच्यामुळें विशूच्या आयुष्याला एक निराळीच गति लाभते. ह्या समाजलढ्यांत तो सामील होतो. मार खातो, पण. . .आपण ह्याहि कसोटीला उतरूं शकलो ह्या समाधानानें तो तृप्त होतो.

'**सरहद्द**' कथानकाच्या बाबतींत विस्कळित झाली आहे. मावशी—त्यांचे पूर्व.युष्य—त्यांतील कडवट घटना हें आख्खें प्रकरणच उपरें वाटतें. इतकें कीं, अभावित शिरलेलें हें दुसरें कथानक सतत जाणवत राहतें आणि रसविन्धामुळे विरस होतो. खरें म्हणजे मावशीचें आयुष्य हा एक निराळ्या कादंबरीचा भाग ठरावा. गांवच्या बाहेर ह्या नव्या ठिकाणीं नवे जीवनानुभव बिशूला येतात. रेल्वेच्या गटारांत बरबटलेला दारूनें झिंगलेला म्हातारा, राजाची चमत्कारिक वागणूक ह्यांनी त्याच्या अनुभवाचें क्षेत्र व्यापक होतें. निरुपयोगी वाटणाऱ्या नानांचा मृत्यु. तोहि इतका भीषण कीं, विशूइतकेंच वाचकाला अस्वस्थ करतो. मृत्युआधीं स्मशानांत त्यांनी आळविलेलें आपल्या लाडक्या लेकीला. अक्काला पोचविल्यानंतरचें—.

"'साधो ! यह तन ठाठ तंबूरे का ऐठत तार मरोरत खूंटी निकसत राग हजुरे का....'' ह्या करुणार्म ओळी नानांच्या निरुपयोगी वाटणाऱ्या अव्हेरिल्या आयुष्याचा ठसा उमटवतात. शिकवण्या करणारा विशू, राजाला फटकारणारा विशू, राजकीय घडामोडींत भाग घेणारा विशू, कमळला रोखठोक सांगणारा विशू, पाध्यांना प्रत्युत्तर देऊन निरुत्तर करणारा विशू असें विशूचें भावजीवन समग्र व समर्थ होत गेलेलें आढळतें.

ह्या दोन खंडांत विशूचें आयुष्य मुक्तिबोधांनी काव्यात्मशैलीनें आलेखिलें आहे. सबंध वातावरणच काव्यात्म्य आहे. शहरी व खेड्यांतील असें दोन तऱ्हेचे जीवन व जीवनानुभव त्यांनीं समर्थपणें हाताळलें आहे.

व्यक्तिरेखन हें मुक्तिबोधांचे फार मोठें यश आहे. मधू, मावशी, भावे, अक्का, नाना आणि राजा ह्या कांहीं काळ येणाऱ्या व्यक्ति कायमचा ठसा उठवून जातात. मानवी जीवनांतल्या समस्या, चढउतार, संघर्ष आणि त्यांची मुळें शोधून तें समर्थपणें मांडण्याचा वकूब मुक्तिबोधांच्या शैलींत निश्चित आहे.

क्षिप्रा आणि सरहद्द एका बैठकींत वाचतांना मनांत एक प्रश्न उद्भवतो तो हा कीं, ह्या दोन्हीं कादंबऱ्यांत जेव्हां विशू वावरत असतो तेथे शब्द अधिक सघन बनतात. त्यांना आर्त, जीवघेणी झेंप लाभते. ह्या अनुभवांना प्रत्यक्षाचा चटका मिळतो. ह्या झंझावाती कडवटतेचा घोट प्रत्यक्ष मुक्तिबोधांनी निश्चित घेतला असावा. त्याखेरीज ही झेंप त्यांच्या शब्दांत समर्थपणें आलीच नसती असा एक समीक्षणाच्या चाकोरीबाहेरचा विचार मनांत डोकावून जातो.

'**क्षिप्रा**' अधिक झेपावणारी वाटते तर '**सरहद्द**' रेंगाळत सरकते. कदाचित दोन कादंबऱ्यांत त्याच्या लिखाणांत नऊ वर्षांचें पडलेलें अंतर हेही एक कारण असूं शकेल. आणि बिशूला अजून चालायचें आहे अशी ग्वाही स्वतः मुक्तिबोधच देतात. पुढें चालणाऱ्या विशूच्या पावलांकडे सुजाण रसिकांचे निश्चित लक्ष लागून राहील हें ह्या कादंबऱ्यांचे-त्यांच्या शैलीचेच यश आहे.

**—केशव मेश्राम**

[**क्षिप्रा—सरहद्द** लेखक : **शरदश्चंद्र मुक्तिबोध.** मौज प्रकाशनगृह, मुं. ४ पृष्ठें १६५ व १९९, किंमत रु. ४।। व ५]

# साभार पोंच

## रंजना प्रकाशन, मुंबई नं. ११.

**नजर**
लेखक : कै. शांताराम पाटील
मूल्य २ रु.

**चंदनाचे खोड लाजे**
लेखक : मुरलीधर वने
मूल्य २ रु. ५० पै.

**दिल्या घरीं तूं सुखी रहा**
लेखक : मधुसूदन कालेलकर
मूल्य २ रु. ५० पै.

**कालिदास विरचित रघुवंश**
लेखक : गणेशशास्त्री लेले, त्र्यंबकर
म. सा. परिषद, सोलापूर आणि पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४ मूल्य १५ रु.

**निळाई**
लेखिका : कै. इन्दु साक्रिकर
सरस्वती प्रकाशन, पुणें २
मूल्य ३ रु. ५० पै.

**अश्लील वाङ्मयाविरुद्ध मोहीम**
लेखक : द. व. गोडबोले
मेनका प्रकाशन, पुणें २.
मूल्य २ रु.

## मौज प्रकाशन, मुंबई ४

**सरी ग सरी**
लेखक—विजय तेंडुलकर
मूल्य—३ रु.

**रथचक्र**
लेखक—श्री. ना. पेंडसे
मूल्य— ६ रु.

**सनई**
लेखक—चिं. त्र्य. खानोलकर
मूल्य—६ रु.

**खून पहावा करून**
लेखक—सरिता पद्‌की
मूल्य—३ रु.

**कावळ्यांची शाळा**
लेखक—विजय तेंडुलकर
मूल्य—२ रु. ५० पै.

**यशवंतराव होळकर**
लेखक —वि. द. घाटे
मूल्य —३ रु.

**वावटळ**
लेखक—व्यंकटेश माडगुळकर
मूल्य—४ रु.

•••


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

अनुक्रमणिका

'पांढऱ्याशुभ्र कपड्यांचें रहस्य ?'

कपडे शेवटीं पाण्यांतून काढतांना त्यांत थोडें टिनोपाल घालून पहा कशी जादू होते ती! तुमचे शर्ट, साड्या, चादरी, टुवाल...अगदीं सर्व प्रकारचीं धुणीं क्षणार्धांत अगदीं पांढरीं शुभ्र धुवून निघतील.

**कपडयांच्या शुभ्रतेसाठीं टिनोपाल म्हणजे अखेरचा शब्द**

Shilpi SGT 70 MAR

अन् या अद्भुत किमयेसाठीं असे पैसे तरी किती पडतात? प्रत्येक वस्त्रामागें एका पैशाहून कमीच! टिनोपाल हें शास्त्रशुद्ध असें एक अत्युत्कृष्ट द्रव्य आहे...त्यापासून तुमच्या कपड्यांना कोणत्याहि प्रकारचा अपाय होत नाहीं.



टिनोपाल हा जे. आर. गायगी एस ए. बाल. स्वित्झरलंड यांचा रजिस्टर्ड ट्रेडमार्क आहे.

सुहिद गायगी लिमिटेड, पो. ऑ. बॉक्स ९६५, मुंबई १ बी आर्





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

# डॉ. गणेश नारायण लवंदे (एक अभ्यास)



—डॉ. म. मा. अळतेकर

अनेक विरोधी वैशिष्ट्यांचें लवंद्यांत वास्तव्य आहे. लवंदे जितके प्रौढ आहेत तितकेच कधीं कधीं पोरकट आहेत. वादाला व विवेचनाला जितके तर्कशुद्ध आहेत तितकेच कांहीं प्रसंगीं विलक्षण पूर्वग्रहदूषित आहेत. तुसडे आहेत तसेच मनमिळाऊ आहेत. अहंकारी आहेत तसेंच विनम्र आहेत. प्रवृत्तीनें जितके विध्वंसक आहेत तितकेच विधायक कर्तृत्वाचे आहेत. भरपूर भांडतील पण प्रसंगीं पदराला खार लावून सुद्धां मदत करतील ! जितके बेरकी आहेत तितकेच भाबडे आहेत.

**मुंबई** विद्यापीठाबरोबर सतत सहा वर्षे भांडणारे, विद्यापीठाला कोर्टात खेचणारे आणि शेवटीं विद्यापीठाला दातीं तृण धरावयाला लावणारे प्रा. डॉ. गणेश नारायण लवंदे यांना जवळजवळ वीस बावीस वर्षे मी अगदीं जवळून बघतो आहे. डॉ. लवंदे यांचे "रूप पाहतां लोचनी" मला नेहमीं धुणें बाळत घालण्याच्या काठीची आठवण होते. (आतां या काठीची लाठी झाली आहे. मूळ वजन ९२ पौंड होते, विद्यमान वजन १३० पौंड आहे) या काठीला जर काया आणि वाचा प्राप्त झाली, भारी किमतीचा अद्यावत् सूट चढविला आणि जाड भिंगाचा आणि जाड चौकटीचा चष्मा बसविला तर ती काठी थेट लवंद्यांच्यासारखी दिसेल. सावळा रंग, केस अगदीं डोक्याबरोबर कापलेले, बोलणें थोडे अडखळत, अस्खलित नाहीं, मुद्रा तरतरीत पण उग्र, प्रथमदर्शनी प्रेमांत पडावे अशी डॉ. लवंदे ही असामी नाहीं. उलट प्रतिकूलच ग्रह होतो. बोलणें ऐकल्या-वर तो कमी होण्याऐवजीं अधिकच वाढतो. "हा माणूस असा आहे, तो माणूस तसा आहे, याला अमुक येत नाहीं, त्याला तमुक येत नाहीं, हा पैशाच्या मागें आहे. आणि तो आणखी कशाच्या तरी मागें आहे" अशी 'वैयक्तिक' टीका लवंदे यांच्या तोंडामधून बाहेर पडत असते. प्रथम लवंद्यांच्याबरोबर कसे बोलावे आणि कसे वागावे हेंच कळत नाहीं. कोणता शब्द आणि कोणते कृत्य प्राध्यापक मजकुरांना गैरवाजवी आणि उपमर्दकारक वाटेल हे साक्षात् बृहस्पतीलाही सांगता येणार नाहीं. आमच्या कॉले-जच्या वार्षिकोत्सवाची आमंत्रणपत्रिका इतर प्राध्यापकांच्या प्रमाणेंच एकदा डॉ. लवंदे यांना देण्यात आली. 'समारंभास येतांना कृपा करून ही आमंत्रणपत्रिका बरोबर घेऊन यावी,' हे वापरून गुळगुळीत झालेले वाक्य इतके स्फोटक असेल याची त्या क्षणापर्यंत आम्हांला कल्पना नव्हती. पत्र पाठविणाऱ्या प्राध्या-पकास धरून लवंद्यांनीं आपला तोफखाना सुरूं केला. "हे, हे वाक्य म्हणजे आमचा भयंकर अपमान आहे. असले पत्र परत पाठवाल तर याद राखा," लवंद्यांनीं दम भरला. "कुठले वाक्य?" प्राध्यापकांनीं घाबरत घाबरत प्रश्न विचारला "येताना बरोबर आमंत्रणपत्रिका घेऊन या. आम्ही याच कॉलेजचे आणि तरी आम्हांला आमंत्रणपत्रिका आणायला सांगता?" लवंदे गुरगुरले. "अहो, पण प्रत्येक स्वयंसेवक तुम्हांला ओळखणार कसा?







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

म्हणून ही आमंत्रणपत्रिका—"दुसऱ्या प्राध्यापकांनीं मध्येंच तोंड घातलें. "तें कांहीं असलं तरी हा माझा अपमान आहे." लवंद्यांनीं भरतवाक्य उच्चारलें. विचारा प्राध्यापक न बोलतां गप्प बसला. त्या मौनाला संमतिलक्षण म्हणा किंवा सर्वार्थसाधनं म्हणा!! सगळ्यांत गंमत म्हणजे, आपल्या अशा बोलण्यामुळें दुसऱ्याचा अपमान होतो हें लवंद्यांच्या कधीं गांवींही नसते. तर्कशास्त्रांत लवंदे महापंडित म्हणून प्रसिद्ध आहेत. पण लहान मुलालाही सहज सुचणारा हा तर्क त्यांना कधींही करतां येत नाहीं.

माणसाचा मूर्खपणा आणि अडाणीपणा पाहिला कीं, लवंद्यांचे पित्त खवळलेच म्हणून समजा. बहुतेक माणसें या गोष्टी हंसण्यावारी नेतात आणि विसरतात. लवंदे अशा अडाणी आणि भंपक माणसाचा प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष पिच्छा पुरवितात. विल्सन कॉलेजमध्यें येण्यापूर्वीं लवंदे रुइया कॉलेजांत होते. एका इंग्रजीच्या प्राध्यापकानें फळ्यावर वाक्य लिहिले होते पण खाली लेखकाचे नांव लिहिले होते ते चुकले होते. ते दुसऱ्याच एका लेखकाचे वाक्य होते. पुढचा तास लवंद्यांचा होता. फळ्यावरील वाक्य वाचतांक्षणींच लवंद्यांनीं उसळून जोरांत विचारलें, "कुणा गाढवानें हे वाक्य लिहिले?" वर्गानें एक मुखानें आणि उत्साहानें आपल्या गुरुजींना माहिती पुरविली. समग्र तासभर इंग्रजीचे प्राध्यापक मूर्ख कसे असतात या विषयावर लवंद्यांचे आवेशपूर्ण आणि माहितीपूर्ण व्याख्यान झाले. वर्ग सुटल्याबरोबर त्या प्राध्यापकाला धरून त्याच्या पापाचे माप इतर सर्व सहकाऱ्यांना साक्षी ठेऊन पदरांत घालण्यास लवंदे परत तयारच! त्यांच्याच एका प्राध्यापक विद्यार्थिनीनें वर्तमानपत्रांत एक इंग्रजी पत्र पाठविले. दुसरे दिवशीं त्यांत इंग्रजीच्या चुका किती आहेत याची खानेसुमारी करणारे पत्र लवंद्यांनी लिहिले. या सगळ्याचा परिणाम म्हणजे लवंद्यांचे नांव निघाले कीं, नाक मुरडणारी, मुठी आवळणारी आणि शिव्या देणारी कितीतरी माणसे भेटतात. लवंदे म्हणजे कारण नसतांना भांडणारा, दुसऱ्याचे दोष तेवढे कावळ्याप्रमाणें बघणारा, नको तिथें नाक खुपसणारा, विध्वंसक प्रवृत्तींचा आणि वाकड्या बुद्धीचा एक भयंकर अहंकारी माणूस असे या लोकांचे ठाम मत झालेले आहे. हे मत सिद्ध होण्यासाठीं आपल्या वागण्यानें, बोलण्यानें आणि लिहिण्यानें लवंद्यांनी भरपूर सामुग्री पुरविली आहे.

अर्थातच हे लोकमत मला मान्य नाहीं. असे मत होण्याची कारणें मला कळतात पण म्हणून त्यावरून निघणारा निष्कर्ष बरोबर असतोच असं नाहीं. जगांत जसें दिसते तसें अनेकदां नसते. लवंदे या नियमाला अपवाद नाहींत. कांहीं माणसांचे बोलणे आणि वागणे वाजवीपेक्षां अधिक सडेतोड असते. अगदीं संतापयावा इतका विखार त्यात भरलेला असतो. एकेक शब्द निखाऱ्याप्रमाणें भाजून काढतो. पण त्यांत कसल्याहि प्रकारचा फसवा संदिग्धपणा, ढोंगी सौजन्य नसते. जो हटवादीपणा वाटतो त्याचा जन्म प्रखर तत्वनिष्ठेमधून झालेला असतो. जो उर्मटपणा वाटतो तो वास्तविक वृत्तीचा सरळपणा असतो. उपहास हा मानवी आदर्शांच्या आदरामधून निर्माण झालेला असतो. डॉ. लवंदे हे वरवर पाहिले तर 'दुर्गुणी' वाटतात पण भरपूर सहवासाशिवाय त्यांच्यात वास्तव्य करणाऱ्या कांहीं अलौकिक गुणांची कल्पना येणें शक्य नाहीं.

माझ्या महद्भाग्यानें डॉ. लवंद्यांचा सहवास मला भरपूर लाभला. मात्र लवंद्यांच्यावर आलेल्या एका महाभीषण आपत्तीमधून या आमच्या भाग्याचा उदय झाला होता. अर्थात या आपत्तीला आमंत्रण लवंद्यांनीच दिले होते. सत्तावन सालापासून मुंबई विद्यापीठाचे आणि लवंद्यांचे भांडण सुरू झाले. आणि त्याचे पर्यवसान म्हणजे १३ ऑगस्ट १९५९ रोजीं विद्यापीठाचे आज्ञेवरून विल्सन कॉलेजनें (अर्थात कांहींही कारण न देतां) लवंद्यांना नोकरीवरून काढून टाकले. विद्यापीठानें त्यांच्याविरुद्ध केलेल्या ठरावामुळें त्यांना दुसऱ्या कोणत्याहि कॉलेजांत नोकरी मिळणें अशक्य होते. लवंदे अक्षरशः बेकार झाले आणि घरांत बसून राहिले. याचा फायदा असा कीं, केव्हांही जा लवंदे घरीं हटकून भेटत. माझ्यासारखे चारदोन अपवाद सोडल्यास सहकाऱ्यांपैकीं कोणीही भेटावयास जात नव्हते. कारण फट् म्हणता ब्रह्महत्या व्हावयाची ही भीति! मी मात्र नेहमीं जात असे. चार सहा तास आमच्या गप्पा चालत. कधीं त्याला पदयात्रेची जोड मिळे. याच काळांत हॅम्लेटच्या शब्दांत सांगायचे म्हणजे 'भांडणा आणि अहंकारा तुझें नांव लवंदे!' (हें सर्वस्वी खरें नव्हे) हें हळूहळू पण निश्चितपणें लक्षांत येऊं लागले. लवंदे हे कमालीचे बुद्धिमान आहेत, विद्वान आहेत हे ठाऊक होते. पण आयुष्यामधून आणि व्यवसायामधून उठविणारी भांडणें, तत्वज्ञानावरील एखादा कठिण आणि किचकट ग्रंथ वाचतांना लवंदे पार विसरतात. आपल्या खोलीत लवंद्यांचे वाचन आणि मनन अहोरात्र चालूं असे. एखादा सिद्धांत समजला म्हणजे किंवा त्यांतले वैगुण्य लक्षांत आले, एखादा विचार स्फुरला कीं, या बेकार आणि अवमानित माणसाचा आनंद त्या खोलीत मावेनासा होई. प्लेटो व ॲरिस्टॉटल, कांट, हेगेल हे लवंद्यांचे आवडते तत्वज्ञ. या महापुरुषांच्या ग्रंथांचे पुनर्वाचन आणि पुनर्विचार करतांना लवंद्यांची ब्रह्मानंदी टाळी लागत असे. त्यापुढें कॉलेजमधील गेलेली नोकरी,

**आस्वी-मनस्विनी**—मन थाऱ्यावर नसलेली एक विचित्र मुलगी. अजूनही ती कदाचित खिडकीतून रिकाम्या नजरेनें बाहेर पहात बसत असेल अन् कधीं कधीं एखादी बाबागाडी पाहिल्यावर स्वतःशीच म्हणत असेल. मला तसलं मूल हवं आहे.
**येत्या दिवाळी अंकांतील 'एक अविस्मरणीय स्त्री'—सदानंद रेगे**








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

विद्यापीठाशी चालूं असलेले भांडण, संसाराची चिंता आणि बहुसंख्य प्राध्यापक मित्रांकडून होणारी उपेक्षा आणि उपहास या सगळ्या गोष्टी लवंद्यांना तुच्छ वाटत. ज्ञानोपासना या शब्दाचे रहस्य मला सांगोपांग समजलें. "**सहज बोलणें हाचि उपदेश । नाहीं काळवेळ तयालागीं**" या तुकारामाच्या ओळींत अंतर्भूत असलेला अर्थ अक्षरशः शेंकडो वेळा मला केवळ लवंद्यांच्यामुळें प्राप्त झाला. गप्पा मारतां मारतां आणि जगाच्या उचापति करतां करतां आमचे पाय तत्त्वचिंतनाच्या गहन अरण्याकडे केव्हां वळत हें कळत नसे. अनेक सिद्धांतांचे, विचारांचे आणि वादग्रस्त विषयांचे स्वरूप मला लवंदे सोदाहरण आणि सप्रमाण स्पष्ट करून सांगत. मी लवंद्यांचा कधींही विद्यार्थी नव्हतो पण या चार वर्षांत मात्र आम्हां दोघांचे कॉलेज सुरू झाले. एक प्राध्यापक, एक विद्यार्थी आणि एक खोली ! गुरूला बसायला कॉट आणि शिष्याला बसायला खुर्ची. तासाचें बंधन नव्हते, सुट्टीचे बंधन नव्हते आणि वेळेचेही बंधन नव्हते. आमचे कॉलेज कधीं सकाळीं, दुपारी, संध्याकाळीं तर कधी रात्रींसुद्धां भरे ! मुंबई विद्यापीठाशीं संलग्न नसल्यामुळें काळाचें बंधन नव्हते. तत्त्वज्ञाना-मधील तर्कशास्त्र आणि सौंदर्यशास्त्र हे लवंद्यांचे फार आवडते विषय. तर्कशास्त्राचे आणि माझे फारसे सख्य नाहीं पण सौंदर्यशास्त्राचे मला भरपूर कुतुहल. लवंद्यांच्याबरोबर केलेल्या चर्चेमुळें प्रथम आपण या विषयांत किती मागासलेले आहोत हे समजले आणि नंतर चार-दोन अक्षरें आत्मसात् करतां आली. ज्याला तत्त्वज्ञान ठाऊक नाहीं त्याला सौंदर्यशास्त्र कधींही आकलन होणार नाहीं हा लवंद्यांचा ठाम सिद्धांत आहे. आपत्तीशिवाय माणसाची उन्नती होत नाहीं आणि आपत्तीशिवाय माणसाची खरी किंमत कळत नाहीं ! लवंदे या भांडखोर, अहंमन्य आणि जगाला तुच्छ लेखणाऱ्या माणसाचे अंतरंग अनेक वर्षे अगदीं जवळून निरखले. माणसाला अनेक आदर्श आदरणीय वाटतात, हा माणूस केवळ कुशाग्र बुद्धीचा रुक्ष कातळ नाहीं, फणसाप्रमाणें या माणसाचे बहिरंग कांटेरी असले तरी अंत-रंगात अनेक दुर्लभ गुणांचे रसाळ गरे आहेत हे याच काळांत पटलें.

बाहेर हिंस्त्र श्वापद वाटणारे लवंदे घरांत मात्र पाळीव प्राण्या-प्रमाणें वावरतात. प्रेमळपणें प्रत्येकाचा परामर्ष घेतात. बाहेर आपल्या तुटक आणि तिरसट स्वभावामुळें ते कोणालाही वाजवीपेक्षां जवळ येऊं देत नाहींत. पण घरांत मात्र त्यांच्या अंगाखांद्यावर मांजराची पिलें उड्या मारतात आणि लवंदे त्यांना वारंवार कुरवाळतात. दूध दिलें कीं नाहीं, भात घातला कीं नाहीं याची चौकशी करतात. मांजरांची ही स्थिती तर त्यांच्या लहान पुतण्यांची मजा आणि मिजास विचारावयासच नको ! या दोन पुतण्या जुळ्या आहेत. आपल्या लवंदे कुटुंब गोव्याचे असल्यामुळें त्यांच्या घरांत सगळे संभाषण कोंकणींत चालतें. ही कोकणी किलबिल ऐकतांना मोठी मजा वाटते. लवंदे कधीं पाणी मागत नाहींत, उदक मागतात ! कोंकणी ही बोलीभाषा असली तरी मातृभाषा म्हणून मराठीचा अभिमान लवंद्यांना अपरंपार आहे. घराचा सगळा कारभार लवंद्यांच्या आईच्या हातांत आहे. इतक्या वयांत आणि अधुनमधून येणाऱ्या दुखण्यांत या बाई सतत काबाडकष्ट करीत असतात. सगळ्या जगाशी भांडणारा हा मुलगा आपल्या आईशीं मात्र अतिशय लीनतेनें आणि प्रेमानें वागतो. कधीं कधीं मूळ स्वभाव उफाळून येतो नाहीं असे नाहीं. मग आपल्या मातृदेवतेला लवंदे वाक्ताडनाचा नैवेद्य दाखवितात. एकदां आई आजारी होती, अंगात ताप होता, त्राण मुळींच नव्हते तरी हे करावे, ते करावे असे तिला वाटत होते, लवंदे भडकले आणि आईला म्हणाले "तू भयंकर स्वार्थी आहेस. सगळी सत्ता, सगळा कारभार तुला हातांत पाहिजे म्हणून ही काम करण्याची तुझी धडपड चालूं आहे. तुझी सून काय आतां लहान आहे ? तिला कां काम करतां येत नाहीं ? पण हातांतली सत्ता तुला सोडायला नको ! म्हणून अशी आजारी पडतेस !" आईच्या आजारावर हे अपूर्व औषध होतें, त्यामुळें ताप उतरण्याच्या ऐवजीं चढला नाहीं हे नशीब ! पण हेच लवंदे घरांतला प्रत्येक वादग्रस्त प्रश्न अतिशय समजूतदारपणें आणि उदार मनानें हाताळ-तात. मुलाचे आणि दोन मुलींची लग्नें होतांना वादळी वारे सुटले होते, मतभेदाच्या विजा कडाडत होत्या. मानापमानाचे ढग गड-गडत होते पण हा सगळा क्षोभ लवंद्यांनीं कधीं युक्तिवाद करून, कधीं विनवणी करून तर कधीं इतरांच्यापेक्षां अधिक रागावून शमविला. गोवेकरांत हुंड्याचे प्रस्थ फार आहे. शिकलेल्या आणि मिळवत्या मुलाला १५ ते २० हजार रुपये हुंडा म्हणून सहज मिळ-तात. लवंद्यांनीं पैशाचा कधीं विचारहि केला नाहीं. आणि मुलींच्या लग्नांत खर्च करण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं. आज दोन्हीही मुलें संसार सुखानें करीत आहेत. इतर अनेक गोवेकरांप्रमाणेंच लवं-द्यांच्या अंतःकरणातही कलावंत दडलेला आहे. लवंदे संगीताचे आणि ते सुद्धां शास्त्रीय संगीताचे फार शोकीन आहेत. अनेक वेळां रेडिओवरील शास्त्रीय संगीताचा कार्यक्रम तल्लीन होऊन ते ऐकत असतात आणि माझ्यासारख्या अडाण्या रागाला संगीतांतील खाचाखोचा समजून सांगण्याचा ते उत्साहानें प्रयत्न करतात. दोन भाऊ व दोघांचे वाढते संसार यामुळें त्यांचे तीन खोल्यांचे घर हे लग्नघरासारखे नित्य भरलेलें असतें. अशा गडबडींत आणि गर्दीत लवंदे एकाग्र चित्तानें ॲरिस्टॉटल, हेगेल वगैरे मंडळींबरोबर विचार-विनिमय करीत असतात, तर कधीं पुढें टाइपराइटर ओढून लिहीत असतात. लवंदे सहसा हातानें लिहीत नाहींत. टाइपराइटरवरच त्यांचे सगळें लेखन चालतें.

**बंधमुक्ता**—वयाच्या मानानें विलक्षण उत्साही, चाळीशी उलटलेली इंग्लिश सिस्टर व्हेरा क्लीमेंट आदिसअबाबांतील दवाखान्यांत 'कविता' जगवीत होती. मेरियल म्हणत होती भारावून टाकणारे सुंदर डोळे तुला लभले आहेत आणि मग भेटली मार्गारेट—सायको पॅथॉलॉजींतली एक केस ...... '**येत्या दिवाळी अंकांतील एक अविस्मरणीय स्त्री**' —**दिलीप चित्रे**

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

अनंतफंदीनें अगदीं निक्षून नसावी म्हणून जी विकटवाट सांगितली तीच लवंद्यांची जन्मापासून ते आजतागायत वहिवाट आहे. याला कारण कांहीं अंशीं दैव आणि कांहीं अंशीं लवंद्यांचा स्वभाव ! अंगीं नम्रता सदा असावी राग कुणावर धरूं नको हा अनंतफंदीचा उपदेश लवंद्यांना साफ नामंजूर असल्यामुळें अगोदरच दैवानें विकट केलेली वाट अधिक विकट झाली ! गोव्यात दरिद्रीच म्हणतां येईल अशा कुटुंबांत लवंद्यांचा जन्म झाला. लवंदे मॅट्रिकच्या परीक्षेंत उत्तीर्ण झाले त्याच दिवशीं त्यांच्या तीर्थरूपांनीं घरचे थोडे झाले म्हणून व्याह्याला घोडे धाडले आणि आपल्या चिरंजीवांच्या पायांत लग्नाची बेडी ठोकली. कॉलेजचे शिक्षण मिळावे म्हणून लवंदे सांगलीच्या विलिंग्डन कॉलेजांत गेले. त्यावेळीं कॉलेजचे प्राचार्य प्रख्यात प्रवासवर्णनकार व लेखक गोविंद चिमणाजी भाटे हे होते. काय पडेल ते व सांगाल ते काम करीन पण शिक्षणाची सोय करा ही या मुलाची विनंती भाटचांनीं मान्य केली. आणि त्यामुळें पहिल्या वर्षाची परीक्षा लवंद्यांच्या पदरांत पडली. पण पैशाशिवाय प्रपंच चालणें अशक्य असल्यामुळें लवंद्यांनीं शिक्षण सोडले आणि अनेकांचे मायपोट जे मुंबई शहर तिथें नोकरीसाठीं ते आले. मुंबई म्युनिसिपालिटींत त्यांना कारकुनाची नोकरी मिळाली. जवळ-जवळ चार वर्षे नोकरी झाली, संसार वाढला. एकदिवस कांहीं कारणावरून वरिष्ठ अधिकारी या कारकुनाला टाकून बोलले. तो शब्दांचा मार लवंद्यांच्या जिव्हारी झोंबला. आणि त्या तिरिमिरीत तो अधिकारी नको नको म्हणत असतांना लवंद्यांनीं राजिनामा दिला. आपल्यावर आतां पांच सात माणसें अवलंबून आहेत याचा विचारहि त्यांनीं केला नाहीं आणि पुढील शिक्षणासाठीं या प्रौढ आणि प्रापंचिक विद्यार्थ्यानें विल्सन कॉलेजमध्यें नांव घातले. प्रत्येक परीक्षेंत पहिला वर्ग मिळवून एम्. ए.ला तत्त्वज्ञान हा विषय घेऊन लवंदे पहिल्या वर्गांत पहिले आले आणि चॅन्सेलर्स मेडल त्यांनीं मिळविलें. शिकवण्या आणि इतर उद्योग करून, संसाराची जबाबदारी न सोडतां, हें यश लवंद्यांनीं संपादन केले. अलोट बुद्धिमत्ता, अपरंपार कष्ट आणि उग्र निग्रह यांच्या बळावर त्यांनीं हा शिक्षणाचा डोंगर ओलांडला होता. विल्सन कॉलेजचे प्राचार्य आणि तत्त्वज्ञान विभागाचे प्रमुख डॉ. मॅकेन्झी यांचे लवंदे हे आवडते विद्यार्थी होते.

डॉ. लवंदे प्रथम अहमदाबादला नवीनच निघालेल्या खाजगी कॉलेजांत प्राध्यापक झाले. नियोजन समितीचे एक सदस्य आणि दिल्ली विद्यापीठाचे भूतपूर्व उपकुलगुरु डॉ. व्ही. के. आर. व्ही. राव हे या कॉलेजचे प्राचार्य होते. कॉलेज नवीनच असल्यामुळें आणि अपेक्षेपेक्षां विद्यार्थी थोडे कमी असल्यामुळें "अर्थशास्त्रज्ञ" डॉ. राव यांना काटकसर करण्यासाठी कांहीं कामें प्राध्यापकांच्यावर लादावी लागली. वाचनालयांत पुस्तकें देण्याघेण्याचें काम प्राध्यापकांनीं


अंगांतल्या व हवेंतल्या उष्णतेच्या तक्रारीं साठीं

पर्ल काढा कुटुंबांत सर्वांच्या उपयोगी पडतो



असा गेल्या चाळीस वर्षांचा अनुभव आहे. सर्व अंग आंतल्या आंत रसरसणें, डोळ्यांची व हातापायांच्या तळव्यांची जळजळ, उन्हाळ्याचा त्रास, पचनेंद्रियें कमजोर होऊन वारंवार अपचन, पोट दुखणे-फुगणें-जड होणें, शौचाला केव्हांच साफ नसणें, नेहमीं अगदीं थकल्यासारखे वाटणें वगैरे उष्णतेच्या तक्रारी शीतल, शक्तिवर्धक, आरोग्यदायक पर्ल काढा जलद दूर करतो. काढा या नावामुळें घाबरण्याचें कारण नाहीं. पर्ल काढा चवदार लागतो. वर्षांतून एक दोन वेळां पर्ल काढ्याच्या ४।५ बाटल्या घेतल्यास प्रकृती उत्तम राहते. पर्ल काढा पुरुषां-प्रमाणेंच नाजुक प्रकृतीच्या स्त्रियांना व मुलांना विशेष उपयोगी पडतो. स्त्रियांनीं गरोदरपणीं सुद्धां निर्धास्त घ्यावा. केव्हां दिवसपाळी केव्हां रात्रपाळीमुळें हटकून होणारें अपचन, पित्त, मलावरोध घालवून प्रकृती चांगली ठेवण्यासाठीं पर्ल काढा पुष्कळ मंडळी वापरतात. आपल्याकडच्या उष्ण हवेंत साहजिक उद्भवणाऱ्या उष्णतेच्या तक्रारींसाठीं पर्ल काढा घ्या.

उष्णतेच्या तक्रारीं चा अनुभविक उपाय

पर्ल कंपनी, मुंबई २७.




Sun 1/64







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

## स्थितप्रज्ञा—

आयर्लंडच्या कोभ बंदरांत बोट लागली. आणि अनेक आयरिश निर्वासितांबरोबर **नोएल कॉस्बी** बोटींत आली. सान फ्रान्सिस्कोला **सुझान ग्रानिसनें** भारतीय साध्व्यांच्या कहाण्या फिक्या केल्या. आणि **मार्जोरी बेटझरनें** कसलीही आसक्ति वा आशंका न बाळगतां मला निर्भर स्नेह दिला.

**—अरविंद गोखले**

**येत्या दिवाळी अंकांतील 'एक अविस्मरणीय स्त्री'**

आळीपाळीनें करावें अशी सूचनावजा आज्ञा डॉ. राव यांनीं जाहीर केली. इतर प्राध्यापक ही काटकसर करण्यांत हातभार लावीत होते. पण लवंद्यांनीं हा अव्यापारेषुव्यापार करण्याचे नाकारले आणि पहिले भांडण सुरूं झाले. विजय लवंद्यांचा झाला पण जळांत राहून माशाशीं वैर करण्यांत अर्थ नाहीं असा समंजस विचार करून लवंदे दुसऱ्या वर्षी मुंबईच्या रुइया कॉलेजमध्यें प्रविष्ट झाले. अहमदाबादच्या कॉलेजचा चालकवर्ग आणि खुद्द डॉ. राव हे लवंद्यांना सोडावयास तयार नव्हते. अधिक पगार देतो, प्रोफेसर करतो अशी प्रलोभनेंही दाखविण्यांत आली. झाले गेले विसरूंया असेही सांगण्यांत आले. पण विसरणें आणि क्षमा करणें हें लवंद्यांच्या स्वभावांतच नाहीं. त्यांच्याकडे सगळा रोखीचा व्यवहार आहे उधारीचा कारभार नाहीं. यामुळें उत्तम शिकविणारे म्हणून जसा लवंद्यांचा लौकिक वाढत होता त्याबरोबरच फटकळपणें बोलणारे व लहान-सहान कारणावरून आणि कधीं कधीं तर कारण नसतांनाही भांडणारे म्हणून लवंद्यांचा दुर्लौकिकही पसरत होता. रुइया कॉलेज भांडण वगैरे न करतां कांहीं वर्षांनीं लवंद्यांनीं सोडले आणि डॉ. मॅकेन्झी यांच्या खास आग्रह आणि आमंत्रणामुळें विल्सन कॉलेजांत ते दाखल झाले. सौजन्य, माणुसकी, व्यक्तिस्वातंत्र्य आणि परस्पर विश्वास यांची जवळ जवळ शंभर वर्षांची परंपरा असलेल्या विल्सन कॉलेजांत लवंद्यांच्या अनेक गुणांना (आणि कांहीं अवगुणांना) उदार आश्रय मिळाला. विद्यार्थी असल्यापासून लवंद्यांना ओळखणारे (आणि ओळखून असणारे) अनेक वडीलधारे प्राध्यापक त्यावेळीं कॉलेजांत होते. कॉलेजचा कारभार त्याकाळीं पूर्णपणें युरोपियन लोकांच्या हातीं होता. त्यामुळें इंग्लंडमध्यें असणारे, विचाराचे, उच्चाराचे आणि आचाराचे स्वातंत्र्य प्रत्येकाला न मागतां मिळालेलें होते. लवंद्यांच्यासारख्या स्वतंत्र मनोवृत्तीच्या माणसाला विल्सन कॉलेजसारखे कॉलेज मिळणें शक्य नव्हते. या काळीं विल्सन कॉलेजांत स्वातंत्र्य आणि परस्पर विश्वास इतका होता म्हणतात कीं, पगाराच्या दिवशीं एखादा प्राध्यापक जर दिसला नाहीं तर तो कां आला नाहीं याची चौकशी आणि चिंता सुरूं व्हावयाची ! माणुसकी इतकी होती कीं, एखादा प्राध्यापक वर्षभर जरी आजारी पडला तरी वर्षभराची भरपगारी रजा मिळत असे. यामुळेंच बाहेर अधिक पगार मिळाला तरी विल्सन कॉलेजांतील नोकरी सोडण्यास कोणताही प्राध्यापक तयार नसे. यामुळेंच एल्फिन्स्टन कॉलेजांत अधिक पगाराची नोकरी मिळत असतांना त्याच कॉलेजांतील तत्त्वज्ञानाचे प्रा. दांद्राद यांनीं या भांडखोर शिष्याला निक्षून सांगितले, 'तुला योग्य कॉलेज एकच— विल्सन कॉलेज. ते कधींही सोडूं नकोस. इतरत्र तुझे कधींही जमणार नाहीं !" प्रा. दांद्राद हे द्रष्टे होते याची प्रचीती पुढें झालेल्या लवंदे प्रकरणावरूनच येते.

याच काळांत आपल्या विषयात निष्णांत आणि विख्यात असणारे कित्येक प्राध्यापक विल्सन कॉलेजमध्यें होते. केवळ मुंबईचेच नव्हेत तर इतर प्रांतांतलेही अनेक विद्यार्थी अमक्या प्राध्यापकांच्या हाताखालींच शिकण्याकरितां म्हणून त्या कॉलेजांत नांव घालीत. लवंद्यांच्या स्वभावांतले एक वैशिष्टय असें कीं, ते आज्ञाधारक नाहींत. परीक्षेप्रमाणें प्रत्येक क्षेत्रांत पहिला नंबर मिळविण्याची ईर्षा हा लवंद्यांचा स्थायीभाव आहे. आपल्या आकांक्षेच्या आड येणारी वडीलकीची अडगळ ते तावडतोब दूर करूं शकतात. हे पहिले स्थान प्राप्त व्हावे म्हणून कष्ट पडतील ते करण्यास लवंदे कधींहि कसूर करणार नाहींत. त्यामुळें थोडयाच काळांत लवंद्यांनीं विल्सन कॉलेजमध्यें रथी महारथींच्या बरोबरीनें उत्तम शिक्षक म्हणून नांव मिळविले. तसाच प्रसंग आला तेव्हां प्रत्यक्ष आपल्या गुरूच्या पायावर डोके ठेवण्याऐवजीं पाय देऊन पुढें जाण्यासही लवंद्यांनीं कमी केले नाहीं ! भीड हा शब्द लवंद्यांच्याकडे नाहीं. आपला मोठेपणा, आपली कार्यक्षमता ही जगाला ओरडून सांगावयाची असते पटवून द्यावयाची असते. मोठेपणा हा मागावयाचा नसतो तो दुसऱ्याच्या हातून हिसकावून घ्यावयाचा असतो, हे दारिद्र्याशी दोन हात करीत करीत आपली प्रगती करून घेणाऱ्या लवंद्यांना पुरेपूर पटलेले होते. लवंद्यांच्या या काळांतील चरित्रक्रमाचा विचार करतांना एकच प्याला नाटकांत रामलालनें केलेल्या सुधाकराच्या स्वभावाच्या व कर्तृत्वाच्या वर्णनाची आठवण होते. सुधाकराप्रमाणेंच लवंदेसुद्धां जीवनकलहाच्या गर्दीतून यावेळीं रस्ता काढीत होते. जगा आणि जगूं द्या हा मंत्र लवंद्यांना मान्य नाहीं. त्यांना प्राप्त झालेले यश हे राखावी बहुतांची अंतरे या उपदेशाबरहुकूम प्राप्त झालेले नाहीं. अनेकांना बाजूला सारून, अनेकांना पराभूत करून, अनेकांच्याबरोबर भांडून आणि एकेकाळच्या जिवलग मित्रांना कधीं सकारण तर कधीं अकारण दुखवून आजपर्यंत लवंद्यांनीं मार्गक्रमण केलें आहे. आश्चर्याची गोष्ट म्हणजे तसा लवंद्यांनीं लोकसंग्रहही केला आहे. एल्फिन्स्टन कॉलेजमधील तत्त्वज्ञानाचे शिक्षक प्रा. दांद्राद हे लवंद्यांचे गुरू या एका शिक्षकाबद्दल व त्याच्या विद्वत्तेबद्दल लवंद्यांना खरोखर आदर आहे. आपण जे थोडेफार शिकलो ते दांद्राद यांच्याकडे असे ते वारंवार सांगतात. जवळजवळ पंचवीस वर्षांपूर्वी या गुरुशिष्यांनीं मिळून बाँबे फिलॉसॉफिकल सोसायटी ही संस्था स्थापन केली. आणि थोडयाच कालावधींत तिला प्रतिष्ठा मिळवून दिली. तत्त्वज्ञानांतील एखाद्या विषयावर अभ्यास करून महिन्यांतून दोनदां निबंधवाचन करावयाचे आणि


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

अनुक्रमणिका

त्यावर चर्चा करावयाची हा संस्थेचा मुख्य कार्यक्रम. येथें वाचलेल्या निबंधामुळें आणि केलेल्या चर्चेमुळें केवळ कॉलिजपुरती मर्यादित असलेली लवंदांची विद्वत्ता आणि विवादपटुता ही सर्वांना परिचित झाली. लवंदांच्या कुशाग्र बुद्धीचा, सखोल व्यासंगाचा व इंग्रजी भाषेवरील प्रभुत्वाचा अनेक प्रतिष्ठित लोकांच्यावर परिणाम झाला. महाराष्ट्र राज्याचे अॅडव्होकेट जनरल श्री. सिरवई, सेवानिवृत्त चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट ऑस्कर ब्राउन, न्या. नाईक अशी अनेक मोठीं माणसें हितचिंतक आणि मित्र म्हणून लवंदांना लाभलीं. केवळ ही माणसें होती म्हणून लवंदे ही व्यक्ती मुंबई विद्यापीठासारख्या मातबर व समर्थ संस्थेबरोबर दोन हात करूं शकली व तिला जन्माचा धडा शिकवूं शकली. लवंदे विद्यार्थ्यांच्यावरोबर तुटक वागत असले, त्यांच्यात मिसळत नसले आणि सवंग लोकप्रियता मिळावी म्हणून विद्यार्थ्यांचे लांगूलचालन करीत नसले तरी विद्यार्थी-वर्गाला या गुरूबद्दल पराकाष्ठेचा अभिमान आणि आदर होता हे लवंदांना ज्यावेळीं कॉलिजमधून सक्तीनें काढून टाकण्यांत आले त्यावेळीं झालेल्या, चार दिवस चाललेल्या आणि सबंध कॉलेजिस-मधून पसरलेल्या उत्स्फूर्त संपावरून दिसून आले. कोणाही प्राध्यापका-करतां असा संप झालेला नव्हता. केवळ विद्यार्थ्यांनीं केलेल्या या संपामुळें विद्यापीठाच्या अधिकारीवर्गाला स्वसमर्थन करण्यासाठीं 'लवंदांचे कागदपत्र' ही पुस्तिका प्रसिद्ध करावी लागली. या पुस्ति-केंत प्रसिद्ध झालेल्या विद्यापीठ व कॉलेज यांच्या गुप्त पत्रव्यवहारा-मुळे लवंदांना भरपूर पुरावा मिळाला व विद्यापीठावर फिर्याद लावतां आली. विद्यार्थ्यांचा हा नकळत लवंदांच्याकडून झालेला लोकसंग्रह हा उभयतांना सारखाच कौतुकास्पद आहे. विद्यार्थ्यांना विद्वत्तेची कदर असते. आणि न्यायाची चाड असते. हेच या संपामुळें सिद्ध झाले आणि केवळ विद्वत्तेच्या आणि गुणांच्या बळावर विद्या-र्थ्यांना आकर्षित करता येते हे लवंदांनीं सिद्ध केले.

लवंदे विल्सन कॉलेजमध्यें आले तेव्हां मी विद्यार्थी होतो. माझा विषय तत्त्वज्ञान नसल्यामुळें व विद्यार्थ्यांच्यावरोबर जेवढ्यास तेवढे वागण्याच्या लवंदांच्या धोरणामुळें आमच्या कॉलेजांत उग-वलेल्या या शेंडेनक्षत्राचा परिचय फारसा झाला नाहीं. पण घरीं मात्र वडिलांच्या तोंडून लवंदांच्या अनेक 'संघर्षकथा' ऐकावयास मिळत. वडिलांचा मूळचा स्वभाव लवंदांच्या इतका नसला तरी भांडखोरच असल्यामुळें दोघांचें गोत्र जमले. कोणाकडे फारसे न जाणारे लवंदे आमच्याकडे आठवड्यांतून एकदांतरी हजेरी लावूं लागले. त्यावेळीं लवंदांची जीभ ही किती तिखट आणि खवचट आहे याची कल्पना आली. अत्रे जवळच रहात असल्यामुळें लवंदांची पालखी आमच्या तीर्थरूपांच्या समवेत आचार्यांच्या दर्शनास जाई. न गच्छेत् ब्राह्मण त्रयम् हा नियम मोडण्यासाठींच जणूकाय प्रा. कृ. पां. कुल-कर्णी सामील होत या चौघांची बैठक म्हणजे काव्यशास्त्रविनोदाची अवीट मेजवानीच असे. अत्रे हे गुणांचे लोभी आणि पूजक असल्या-मुळें लवंदांचे सडेतोड विचार आणि त्यांचे मौलिक विवेचन यामुळें ते लवंदांच्याकडे आदरानें आणि कौतुकानें बघूं लागले. याच सुमा-राला "**नवयुग**" साप्ताहिकाच्या जोडीला अत्र्यांनीं "**समीक्षक**"

> ## मुक्ता—
>
> **'बर्निये श्रेयमांद'** ही पॅरिसची परी मला इंग्लंडच्या गाडींत भेटली. दोघांनाही एकाच पार्टीला जायचं होतं. आम्हीं गेलों. तिनें त्या दिवशीं मला असामान्य स्नेह दिला. निरोप घेतांना मी तिचा पत्ता मागितला. तिनें डायरींत लिहिलें.
>
> Bernie Shreymond
> Paris XI
>
> **—रमेश मंत्री**
>
> **येत्या दिवाळी अंकांतील— 'एक अविस्मरणीय स्त्री'**

मासिक काढण्यास सुरुवात केली होती. त्या मासिकांत मराठींतील नामवंत टीकाकारांचे वाभाडे काढणारे, त्यांचे सौंदर्यशास्त्रासंबंधींचे अज्ञान आणि अपुरे ज्ञान उघड करणारे असे तीन लेख अतिशय कडक भाषेंत लवंदांनीं लिहिले. मराठी वाचकांना लवंदांचा परिचय झाला तो या टीका–लेखांमुळें. लवंदांच्या प्रखर टीकेपेक्षां मराठी लेखकांना जो राग आला तो लवंदे त्यांच्या विद्वत्तेला कस्पटा-इतकेसुद्धां मानायला तयार नव्हते त्यामुळें. लवंदे कधीं शांतपणें वादविवाद करीत नाहींत. जणुं ते भांडत आहेत असे वाटते. समजावून सांगण्यापेक्षां दुसऱ्याला अडवण्याकडे प्रवृत्ती फार. वरे प्रतिपक्षाला इतके क्षुद्र आणि तुच्छ लेखावयाचे कीं, तो माणूस अगदी शांतिब्रह्माचा सागर असला तरी संतापानें त्याला फेफरेंच यावें. लवंदे यांचे हे मुस्कटदाबीचे तंत्र अनेकदां पटत नाहीं. कारण यांतले कितीतरी लेखक आणि टीकाकार जिज्ञासू आहेत, व्यासंगी आहेत, लवंदांचा हा अधिकार मानणारे आहेत. केवळ आम्हांला विषय समजावून सांगा आणि आमच्या शंकांचें निरसन करा अशी त्यांची माफक मागणी आहे. वामन मल्हार जोशी व्याख्यानमालेंत लवंदांनीं जी व्याख्यानें दिली ती विद्वत्तापूर्ण खरी पण लोकांच्या डोक्यावरून गेली. लवं-दांना हा विषय समजावून सांगतां येत नाहीं, सुबोध करतां येत नाहीं असेही नाहीं. गेली चारपांच वर्षे लवंदांच्या तोंडून सौंदर्यशास्त्रांतील व टीकाशास्त्रांतील अनेक कूटप्रश्नांचे मार्मिक व मौलिक आणि तितकेच सुबोध व रसाळ विवेचन मी कित्येकदां ऐकले आहे. पण लोकांना खिजवण्यांत, त्यांच्या अज्ञानाचा फुगा फोडून पाणउतारा करण्यांत जो एक बालिश आनंद असतो तो प्रगल्भ बुद्धीच्या लवंदांना फार प्रिय आहे.

अनेक विरोधी वैशिष्ट्यांचे लवंदांच्यांत वास्तव्य आहे. लवंदे जितके प्रौढ आहेत तितकेच कधीं कधीं पोरकट आहेत. वादाला व विवेचनाला जितके तर्कशुद्ध आहेत तितकेच कांहीं प्रसंगीं विलक्षण पूर्वग्रहदूषित आहेत. तुसडे आहेत तसेंच मनमिळावू आहेत. अहंकारी आहेत तसेंच विनम्र आहेत. प्रवृत्तीनें जितके विध्वंसक आहेत तितकेच विधायक कर्तृत्वाचे आहेत. भरपूर भांडतील पण प्रसंगीं पदराला खार लावूनसुद्धां मदत करतील ! जितके बेरकी आहेत तितकेच भाबडे आहेत. सीनेटच्या निवडणुकीकरितां उभे राहून पडले

अनुक्रमणिका





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

तेव्हांची गोष्ट ! मतयाचना करण्यासाठीं अनेक काॅलेजांमधून त्यांचा दौरा चालू होता. घरीं परत आले कीं, मते किती मिळणार याचा हिशेब सुरूं होई. 'अमक्या अमक्यांची मते नक्की मिळणार,' लवंदे घोषणा करीत. 'कशावरून ?', माझा ठरलेला प्रश्न असे ! 'कशावरून म्हणजे काय ? खुद्द त्या गृहस्थानेच, 'आमचे मत तुम्हाला', असे सांगितले." "माणसे अनेकदां खोटें बोलतात," मी मतभेद मांडतों. "पण खोटे बोलण्याचे कारण काय ?" "खरें बोलायला हरकत नाहीं पण–" मी अडतो. "तुझा माणसावर विश्वास नाहीं. तूं तुच्छतावादी आहेस. माणूस म्हणजे–" पण लवंद्यांना माणूस म्हणजे काय विशेषत: प्राध्यापक नांवाचा माणूसप्राणी ही काय जात असते हे लौकरच कळले. लवंद्यांचे अनेक 'दाते' मित्र ऐनवेळीं उलटले आणि लवंदे पडले.

काॅलिजांत लवंद्यांचा जितका उपद्रव असे तितकाच फायदाही मिळे. कोणाचीही रास्त आणि न्याय्य तक्रार जोरानें मांडायला लवंदे नेहमीं तयार असत. यामुळें प्राध्यापकांच्या बैठकींना कित्येकवेळां रणांगणांचे स्वरूप प्राप्त होई. जो प्राध्यापक आपल्या वतीनें भांडण्यास सुपारी देई तोच कधीं कधीं ऐनवेळीं सपशेल माघार घेऊन ह्या वीराला पार तोंडघशी पाडी. त्याक्षणी लवंदे खरपूस शिव्या देत पण चारदोन महिन्यांनीं इतिहासाची पुनरावृत्ती होई. कधीं कधीं हे तर्कशास्त्र पंडित 'वड्याचे तेल वांग्यावर काढण्यास' कमी करीत नसत. छप्पन्न सालापासून संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नानें व आंदोलनानें तीव्र स्वरूप धारण केले. लवंद्यांना मराठी भाषेचा व महाराष्ट्राचा अभिमान दांडगा ! अत्र्यांच्या नवयुगमधील एकएक जोरदार लेख वाचून लवंदे परम संतुष्ट होत. एक एक बातम्या वाचून अणि काँग्रेसश्रेष्ठींची लबाडी व पक्षपात पाहून त्यांचा संताप अनावर होई. ह्यामुळें ह्या काळांत लवंद्यांच्या बरोबर बसमधून प्रवास करणे किंवा रस्त्यावरून हिंडणें हे भयंकर धोक्याचे असे. याचवेळीं आमच्या काॅलेजांत ज्यूनियर बी. ए.च्या परीक्षेंत नापास झाल्याबद्दल पांचसहा गुजराथी मुलामुलींना लवंद्यांनीं आपल्या विषयांत अडकवले. गुजराथी वर्तमानपत्रांत एकच ओरड झाली. प्रत्यक्ष प्रिन्सिपाॅलनीं रदबदली करण्याचा प्रयत्न केला. पण 'आपला निर्णय बदलल्यास मी राजिमाना देईन.' अशी लवंद्यांनीं उलट धमकी दिली. लवंद्यांची बाजू भक्कम होती. तात्विक भूमिका खंबीर असल्यामुळें राजकीय वादळ उठविण्याच्या उपद्व्यापाला त्यांनीं भीक घातली नाहीं.

सत्तावन सालीं लवंद्यांच्या व मुंबई विद्यापीठाच्या युद्धास प्रारंभ झाला. खरोखर पहिले भांडण लवंद्यांच्या भावाचे व रजिस्ट्रारचे ! खुद्द लवंद्यांचा या भांडणाशीं कांहींही संबंध नव्हता. लवंदे या भांडणांत पडले ते केवळ बंधुप्रेमामुळें ! पण पुढें भावाचे व रजिस्ट्रारचे भांडण हे पुढील महायुद्धाचे तात्कालिक कारण ठरले. एक वर्षभर या भांडणाचा आमच्यापैकीं बहुतेकांना पत्ता नव्हता. लवंद्यांच्या विरुद्ध शिस्तभंगाचा पहिला बडगा उगारला तेव्हां कांहींतरी गडबड आहे असे कळले. 'लवंदे प्रकरण' हे एक महाभारत आहे. कोणी लिहिण्यास च बसला तर ४००–५०० पानांचा एक ग्रंथ तयार होईल. केवळ खाजगी आणि दोन व्यक्तींच्या भांडणामधून निर्माण झालेल्या या प्रकरणाला पुढें सार्वजनिक महत्व प्राप्त झाले. कांहीं तत्त्वांचा विचार करणें आवश्यक ठरले. जिच्यावर आरोप करण्यांत आलेले आहेत त्या विद्यापीठाच्या कार्यकारिणीनें आरोप करणाऱ्याच्याच खटल्यांत न्यायाधीश होणें योग्य कीं अयोग्य ? प्रोफेसर हा नोकर कोणाचा ? विद्यापीठाचा कीं, काॅलेजचा ? काॅलेजच्या अंतर्गत कारभारांत हस्तक्षेप करण्याचा अधिकार विद्यापीठाला आहे कीं नाहीं ? स्वाभिमान हा प्राध्यापकाचा गुण की दुर्गुण ? बहुमतानें शिक्षकांनीं निवडून दिलेल्या प्राध्यापक उमेदवाराला काॅलेजवर दडपण आणून काढून टाकणें हे लोकशाहीच्या, कायद्याच्या व नीतीच्या दृष्टीनें कितपत योग्य ? प्राचार्यानें गुन्हा केला कीं, त्याचा हरप्रयत्नानें बचाव करावयाचा आणि एखादा प्रोफेसर सांपडला कीं, त्याला झोडपून काढायचे हा पक्षपात नव्हे कां ? एखाद्या वीस वर्षांवर नोकरी केलेल्या प्राध्यापकाला कोणतेही कारण न देतां, बचावाची संधी न देतां तडकाफडकी काढून टाकणें हे कायदेशीर असेल. पण असला अमर्याद, अमानुष आणि अन्याय्य अधिकार काॅलेजला असणे हे किती धोक्याचे आहे ? कायम नोकरी या शब्दाला कांहीं अर्थच उरत नाहीं. लवंद्यांच्या ह्या भांडणांत असे अनेक विवाद्य व मूलभूत प्रश्न उपस्थित झाले होते. अशा प्रकारच्या भांडणांत संपूर्ण अपराधी किंवा संपूर्ण निरपराधी कोणीच नसते. लवंदे हे कमी अपराधी होते आणि विद्यापीठ हे अधिक अपराधी होते.

लवंद्यांच्यात असणाऱ्या अनेक दुर्मिळ गुणांचा या प्रकरणांत परमोत्कर्ष झाला. लवंद्यांचे सगळे व्यक्तिमत्व व त्यांतील अनेक बरेवाईट विशेष अक्षरश: ढवळून निघाले. त्यांत असणारा हिणकस अंश ह्या अग्निकुंडात पार जळून गेला. आजचे लवंदे हे कालच्या लवंद्यांपेक्षां कितीतरी वेगळे वाटतात.

शिक्षक म्हणजे प्राचीनकाळच्या भिक्षुकाची सुधारून वाढविलेली आवृत्ती हा जगाचा समज म्हणा गैरसमज म्हणा लवंद्यांच्या वर्तनानें दूर झाला. शिक्षक कसा असावा व तो कसा असू शकतो हे जगाला दिसून आले. फार तर इतकेच म्हणतां येईल कीं, शिक्षक हा लवंद्यांच्या इतका भांडखोर व बेमुर्वतखोर नसावा. पण लाचार, लोंचट व लोभाचे मांजर असणाऱ्या शिक्षकापेक्षां थोडा उर्मट, थोडा अहंकारी पण व्यासंगीं शिक्षक परवडला.

आज लवंद्यांच्या आयुष्यांतले एक पर्व संपले आहे. बेकारीच्या व भांडणाच्या काळांत लवंद्यांनीं आपल्या विषयाचा खूप अभ्यास व व त्यासंबंधीं खूप विचार केला आहे. वयोमानामुळें, आलेल्या अनुभवामुळें व केलेल्या चिंतनामुळें वृत्तीत शांतपणा व स्थैर्य आले आहे. युनिव्हर्सिटी ग्रँटस कमिशननें संशोधनासाठीं व लेखनासाठीं मदत दिलेली असल्यामुळें लवंद्यांच्या व्यासंगरूपी डेरेदार वृक्षाला ग्रंथांची भरपूर फळे यावीत अशी त्यांच्या सहकाऱ्यांची, मित्रांची व विद्यार्थ्यांची अपेक्षा आहे. लवंदे ही अपेक्षा नक्की पूर्ण करतील अशी माझी खात्री आहे ! ●●●

**अनामिका**–लंडनच्या पेटीकोट लेन मधील बाजार म्हणजे आपला चोर बाजार ! साठ वर्षांपलिकडचं एक वृद्ध, सुरकतलेलं पण सुंदर तारुण्य मला म्हणत होतं "प्लीऽऽज हे घ्याना !" तिच्याकडून मी कपड्यांत ठेवायची सुगंधी पावडर घेतली आणि बरंचसं अविस्मरणीयही ! **येत्या दिवाळी अंकांतील 'एक अविस्मरणीय स्त्री' —वसंत देशमुख**



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट






## "बहादूदुर" लाल बहादूदुर

**माणसाच्या** मोठेपणाची, त्याच्या कर्तृत्वाची, त्याच्या अंगच्या विविध गुणांची कसोटी साध्यासीध्या काळांत फारशी लागत नाहीं. अर्थातच गुण असतात ते लपत नाहींत. त्याचा जो काय प्रकाश पडायचा तो पडतोच. परंतु संकटाच्या, संघर्षाच्या, सर्व दृष्टींनीं खायला उठलेल्या काळांत माणसाच्या गुणांची, कर्तृत्वाची खरी कसोटी लागते असें मला वाटतें. त्या कसोटींत जीं माणसें आपले 'सुवर्ण' सिद्ध करतात तींच माणसें इतिहासांतला आपल्या कर्तृत्वाचा आलेख 'सुवर्णाक्षरांनीं' लिहून जातात. त्या ठिकाणीं त्यांचे गुण ही येणाऱ्या पिढयांची 'मिरास' बनते. त्यांच्या शब्दांना 'वेदां'चे सामर्थ्य प्राप्त होते. त्यांच्या कृत्यांतून एक नवा इतिहास आकारूं लागतो. त्यांच्या कर्तृत्वाची जयगाथा ही येणाऱ्या पिढ्यांची 'गीता' बनते. त्यांचें नुसते अस्तित्व हें त्या त्या समाजाला कांहीं नवें तेज देऊन जाते.

नामदार लाल बहाद्दुर शास्त्री हे गेल्या वर्षी जेव्हां पंडितजींच्या खुर्चीवर जाऊन बसले, तेव्हां त्यांच्या व भारतीय जनतेच्याही पुढें अनेक प्रश्नचिन्हें होतीं. एक फार मोठा समजला गेलेला वारसा त्यांनीं स्वीकारला होता. त्यामागें कांहीं संपन्न व्यक्तित्वादि गुणवत्ता होती. ह्या देशाच्या व जागतिक राजकारणांतहि वर्षानुवर्षें ज्यानें नेतृत्व केलें अशा पंडितजींची ती 'गादी' होती. तिला 'इतिहास' होता. कांहीं 'वर्तमान'ही होते. 'पंडितजीनंतर कोण ?' अशी चर्चा केवळ भारतीयच करीत असें नव्हे, तर जगही करीत असे. अशा पार्श्वभूमीवर ही 'वामनमूर्ति' त्या गादीवर बसली. आणि तिनें तो कांटेरी मुकुट धारण केला. मोठी जिद्द होती— खूप काम करण्याची! त्यामुळें ताण पडला. प्रकृति खूप बिघडली. पण शास्त्रींची प्रकृति ही प्राकृतिक दृष्टया कशीही असली तरी ह्या माणसाचें मन मात्र 'पोलादा'चें आहे हें त्यानंतरच्या सर्व घटनांची गणितें मांडली तर ध्यानीं येईल. शास्त्रीजींची राजवट सुरू झाल्यापासून ह्या ना त्या कारणांनीं सतत संघर्षच सुरू झाले आहेत. राजवटीच्या प्रारंभीं अति गंभीर अन्न समस्या उभी राहिली. त्यानंतर रामेश्वरचे 'वादळ' झालें. मग झालें मद्रासचे 'भाषिक' आंदोलन, नंतर कम्युनिस्टांच्या कारवाया व देशव्यापी धरपकड आली. गोव्याच्या प्रश्नावरून पक्षांतर्गत तीव्र संघर्ष उभा राहिला. दगडफेंक सहन करावी लागली. कच्छचा संग्राम झाला व कच्छ करारावरून शास्त्री सरकारवर सर्वत्र प्रखर टीका झाली. आतां काश्मीरच्या निमित्तानें एक फार तीव्र स्वरूपाचा संघर्ष दाराशीं उभा ठाकला आहे. ह्या सर्व प्रसंगीं भावविवश नेता गोंधळून गेला असता. भावनेच्या भरांत त्यानें कदाचित् कांहीं अयोग्य व अघोरी उपायही योजिले असते. फारच कचखाऊ असता तर त्यानें त्यागपत्रही बहाल केले असते. पण शास्त्रींच्या वामनमूर्तीत 'पोलादी' मन आहे ह्याचा प्रत्येक वेळीं प्रत्यय आला. जमिनीवर पाय खंबीरपणें रोंवून उभा राहणारा नेता असेंच शास्त्रीजींचें वर्णन करतां येईल. शास्त्रीजी स्वप्नरंजनवादी नाहींत. नेत्यानें तसें असून आजच्या जगांत चालतही नाहीं. गेल्या सबंध वर्षांत फार कमी, आवश्यक तेवढें, आग्रही असेंच शास्त्रीजी बोलले आहेत, त्यांच्या बोलण्यांत संथपणा आहे. पण संदिग्धता नाहीं. कांहीं तळमळ आहे. नेत्याचा आग्रहीपणा आहे. ह्या देशाच्या कर्तृत्वाविषयीं व अस्मितेविषयीं आत्मविश्वास आहे. त्यामुळें पाकिस्ताननें आक्रमण केल्यानंतरची त्यांचीं सारीं निवेदनें मोठीं मनोज्ञ झालीं आहेत. विदेशांतही शास्त्रीजी जाऊन आले. सर्वत्र त्यांचें चांगलें स्वागतहि झाले. पण शास्त्रीजी कांहीं "भ्रम" घेऊन परत आले नाहींत. ह्याचा प्रत्यक्ष त्यांनीं 'युद्धबंदी' विषयीं ब्रिटनला जें सुनावलें त्यांत येतो. '**वज्रादपि कठोरानी मृदूनि कुसुमादपि**' असें 'विष्णुदासा'चे वर्णन केले जात. शास्त्रीजी असे 'विष्णुदास' आहेत. नंदा, चव्हाण, टी. टी. के यांच्यासारख्या खंबीर सहकाऱ्यांची साथ त्यांना आहे. शांत व संयत नेतृत्वानें शास्त्रीजींनीं देशाचा विश्वास संपादन केला आहे. सतत कांचामुळें शास्त्रीजींना अजून देशाचा दौराहि करायला मिळालेला नाहीं. तरीही शास्त्रीजींच्या नेतृत्वानें हें **नेतृत्व विजयी होणारें, नवा आत्मविश्वास, नवी चेतना उत्पन्न करणारें आहे."** असा विश्वास जनतेला दिला आहे. गेल्या महिना दोन महिन्यांत ह्या विश्वासाचें 'विश्वरूप' दर्शन मी रस्त्यांत, गाडींत, कार्यालयांत, चौकांत आणि घरांतहि घेतले आहे. आणि म्हणूनच ह्या 'आमच्या' नेत्याला मी अभिवादन करतो !

* *








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# " तपस्वी " सातवळेकर

**काळ** वदलला, सृष्टीचें रूप वदलले. शास्त्रांचे संशोधन झालें. जीवनविषयक कल्पना वदलल्या, तशाच तपश्चर्येच्या कल्पनाही वदलल्या. ईश्वराच्या प्राप्ती सवंधींच्या कल्पनांत वदल झाला. ईश्वराचीं अनेक रूपें 'कर्मा'च्या रुपानें साकारलीं आणि त्या त्या कर्मांची साधना ही ईशसाधना वनली. ईशकल्पना अमूर्त राहिली नाहीं. आणि ईशसाधकही हिमालयांत न जातां माणसांत राहून, प्रपंच साधून त्या त्या साधना करूं लागले. प्रत्येकाची 'साधना' वेगळी, प्रत्येकाचें 'कर्म' वेगळें. प्रत्येकाची 'नमस्कार' पद्धति वेगळी पण अखेर सारे नमस्कार 'केशवा'प्रतच जाणारे ! त्याचाच आशिर्वाद मागणारे आणि त्या आशिर्वादाचें यशस्वीही होणारे !

महाराष्ट्राचे एक श्रेष्ठ तपस्वो, वेदमूर्ति, पंडित **श्री. दा. सातवळेकर** ह्यांच्या जीविताकडे, जीवीत कार्याकडे साधनेकडे पाहिल्यानंतर हेंच म्हणतां येण्यासारखें आहे. तपस्वी 'लौकिका'तून वाहेर पडतो आणि 'अलौकिका'च्या साधनेंत त्याच्या जीवनाची परिणति होते. पंडितजींच्या जीवनाचा प्रारंभ तुमच्या आमच्यासारखाच 'लौकिका'च्या पूजेनें झाला. प्राथमिक शिक्षण पुरें केल्यानंतर त्यांनीं चित्रकलेचा अभ्यास केला. त्यांत श्रेष्ठत्व प्राप्त केलें आणि 'रंगसाधना' व्यवसाय म्हणून सुरूं केली. चित्रकलेचा व्यवसाय करीत असतांना त्यांनीं वेदांचें अध्ययन सुरूं केलें. स्वातंत्र्याच्या आंदोलनांतहि त्यांनीं क्रियाशील भाग घेतला. त्यापायीं त्यांना अनेकदां हद्दपारी व तुरुंगवास भोगावा लागला. ह्या साऱ्या साधना चालू असतांना त्यांचा वेदांचा अभ्यास चालूंच होता. १९१८ मध्यें त्यांनीं औंधला कायम वास्तव्य पत्करलें आणि ध्येयवाद म्हणून '**स्वाध्याय मंडळ**' ही संस्था स्थापन केली. संशोधन लेखन– मनन-चिंतन ही त्यांची साधना सुरूं झाली. त्या साधनेचा परिणाम म्हणून त्यांनीं जी ग्रंथरचना केली तिचा तपशील स्वतःच खूप बोलका आहे. हिंदी, गुजराथी व मराठी अशा तीन्हीं भाषांतून पंडितजी उत्तम लेखन करतात. इंग्रजीही लेखन त्यांनीं केलें आहे. **चाळीस हजार** पृष्ठांच्या वर ह्या लेखनाची संख्या भरेल. पंडितजींच्या संपादकत्वाखालीं स्वाध्याय मंडळानें आजवर वेद, उपनिषद्, गीता, रामायण, महाभारत आदि ग्रंथांचें संपादन केलें आहे. विशेषतः **वेदांचें संपादन** ही पंडितजींची फार मोठी देणगी म्हणावी लागेल. पंडितजींचें सारे जीवन एखाद्या योग्याचे, मिशनऱ्याचे जीवन आहे. त्यांच्या ह्या ध्येयवादी जीवनाचा गौरव १९५९ सालीं 'राष्ट्रपतीं'नीं केला. आज त्यांची संस्था पारडी (जि. बलसार) येथें स्थित आहे. काका कालेलकर यांजप्रमाणें हा महाराष्ट्राचा सुपुत्र गुजराथेंत 'तपस्या' करीत जीवन कंठतो आहे. गुजराथींतही ग्रंथरचना करून भारतीय एकात्मतेची जणुं पूजा बांधतो आहे. त्यांचें वय आज ९९ वर्षांचें आहे. पण चेहरा अजूनही तेजस्वी, तुकतुकित आहे. सात्विकतेचे फार मोठे तेज त्यांच्या मुखावर विलसत आहे. 'साधने'ची तृप्ती पिऊन हा 'कर्मयोगी' ९९ व्या वर्षीही अजून ताठ उभा आहे. 'पुरुषार्था'ची साधना आहे ती !

त्या साधनेला हें अभिवादन ! त्या तपश्चर्येला हें वंदन !! ★★

# जय जवान ! जय भारत !!

**भारतीय** सेनेचा विजय असो ! भारतीय जवानांचा विजय असो. कुशल रणनीतीनें शत्रूला खडे चारणाऱ्या सेनानींचा विजय असो. पॅटन रणगाडे आणि अमेरिकन सॅवर जेट्‌च्या जोरावर ह्या भारतीय अस्मितेला आव्हान देणाऱ्या शत्रूला आकाशांतच चोख प्रत्युत्तर देऊन भूमीवर पाडणाऱ्या शूर धीर वैमानिकांचा, कीलर-पथानियांचा व असंख्य अनामिकांचा विजय असो. आपल्या रक्तानें, आपल्या यातनांनीं, आपल्या अतुलनीय पराक्रमानें, धाडसानें आणि ह्या मायभूमीवरच्या असीम प्रेमानें समरांगणावर उभे ठाकलेल्या सैनिकांचा, वैमानिकांचा, त्यांना मदत कणाऱ्या नागरिकांचाही विजय असो. जवान हो, ही साऱ्या राष्ट्राची भावना आहे. कोटिकोटी सदिच्छा आज तुमच्या पाठीशीं उभ्या आहेत. कारखान्यांत कामगार, कार्यालयांतला कारकून व अधिकारी, नागरी संरक्षक शिपाई, गिरणींतला वाबू, स्वयंपाक घरांत रमणारी स्त्री आणि उनाडण्याचें ज्यांचे वय ती लहान लहान मुलें ह्या साऱ्यांच्या हृदयांत आज ही सदिच्छा गरजते आहे. तुमचें युद्ध हे न्यायाचें अन्यायाविरुद्ध, सुरांचे असुरा विरुद्ध देवांचे सैतानाविरुद्ध, बुद्धाचें युद्धाविरुद्ध असें युद्ध आहे, याची साऱ्यांना जाणीव आहे. आज साऱ्या भाषा एक सुरांत गरजत आहेत. **जय जवान ! जय भारत !!**

तुम्हीं लढतां आहांत. तुमच्या वीरगाथा हृदयसंपुटांत सांठविण्यासाठीं भारतीय जनता कान आणि मन एक करून प्रतिदिनीं दिवस रात्र धडपडते आहे. तुमचें बलिदान तिच्या उरांत वेदना उत्पन्न करते. तिला जखमी करून जाते आणि तुमचा पराक्रम तिला रोमांचित करतो. कारण तुमचें आणि तिचें रक्ताचें नातें आहे. तें नातें धर्माचें नाहीं, जातीचें नाहीं. एका संस्कृतीचें, परंपरेचें, राष्ट्रीयतेचें ते नाते आहे. जवान आणि जनता हें नातें अभेद्य आहे. हें नातें काश्मीरमधल्या खेड्यापाड्यांतल्या सामान्य माणसानें ओळखलें, म्हणून त्याला पैशाचे, धर्माचे, स्वतंत्र काश्मीरचें प्रलोभन मोहवूं शकले नाहीं. त्यानें तुमच्याकडे धांव घेतली. शत्रूचे मोर्चे गारद करण्यासाठीं तुम्हांला सहाय्य केलें. तुमच्या कर्तृत्वाबद्दल आज साऱ्यांना अभिमान वाटतो आहे. कारण माना देऊनही तुम्हीं ह्या आक्रमित राष्ट्राची शान राखली आहे. स्वाभिमानी राष्ट्राची सेना 'दुर्गे'चें रूप घेऊन उठली तर ती किती भीषण रणकंदन घडवूं शकते ह्याचा प्रत्यय तुम्हीं दिला आहे. तुमच्या पराक्रमानें ह्या मरगळलेल्या देशांत एक आग फुलविली आहे. नवा आत्मविश्वास दिला आहे. नव्या सिद्धांतांना जन्म दिला आहे. नवी अस्मिता फुलवली आहे. बलिदानानें एक राष्ट्र सजीव, चेतनामय केलें आहे. गेल्या कित्येक शतकांची धूळ झटकली आहे क्षुद्र मतभेदांना मूठमाती दिली आहे. प्रांत, जात, भाषा, यांच्या भेदांतून एक नवा राष्ट्रपुरुष तुम्हीं उभा केला आहे. जो येणाऱ्या अनेक पिढ्यांना मार्गदर्शन करीत राहणार आहे. जें ठराव–चर्चांनीं घडलें नसते तें तुम्ही असामान्य अशा कृतीनें घडवून आणलें आहे. तुम्हीं आजच्या ह्या चेतनामय राष्ट्राचे अग्रदूत आहांत, पाईक आहांत. आधार आहांत. तुमच्यापैकीं ज्यांनीं बलिदान केलें असेल त्यांच्या मातीतून पुन्हां महापराक्रमी सुपुत्र ह्या मातेला मिळोत. ज्यांचा पराक्रम यशस्वी झाला असेल त्यांना कोटि कोटी यश मिळोत. हा त्याग, हें बलिदान, हा पराक्रम, हें तेज, ही रणकुशलता हा तर येणाऱ्या अनेक पिढ्यांचा वारसा आहे. तो जतन केला जाईल. केला गेलाच पाहिजे.

जवानहो ! तुमच्या पराक्रमाला हें अभिवादन !!

**–आदित्य**

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

# आज नवा इतिहास घडे




**काश्मीरच्या** नंदन-वनांत, पंजाबच्या रस्त्यांतून, सिंधुभूमीच्या परिसरांत, आसामच्या टेंकड्यांवर, श्रीकृष्णाच्या द्वारकेंत आणि महाराणा प्रतापाच्या पराक्रमी भूमींत आधुनिक भारताच्या इतिहासांतलें एक नवें व महान पर्व लिहिलें जात आहे. तें पर्व अनेक अर्थांनीं नवें आहे व महानही आहे. रणांगणावर जेव्हां सेना समोरासमोर उभ्या राहतात आणि विजयाच्या कांक्षेनें जेव्हां युद्ध लढलें जातें, तेव्हां कधीं कधीं क्षणिक जयपराजयांच्या अवस्थांतून त्यांना जावेंच लागतें. युद्धांतला तो एक अपरिहार्य भाग आहे असेंच म्हटलें पाहिजे. ह्या नव्या पर्वांतही कांहीं 'मूल्य' आम्हीं दिलें आहे. पण फार अमौलिक असें कांहींतरी आम्हीं कमावलेंही आहे. आणि केवळ सौद्याची भाषाच करायची झाली तर आम्हीं दिलेल्या किंमतीच्या मानानें आम्हीं कमावलेलें 'अमौलिक' फार मोठे आहे. ह्या युद्धांत आम्हीं कांहीं विमानें गमावली, कुशल सैनिक गमावले, वैमानिकांना मुकलो, कांहीं सामान्य नागरिक व त्यांची घरें उध्वस्त झाली. अशांत जीवन आज आमच्या वांट्याला आलें आहे. काहीं लौकिक समस्याही आज आमच्यापुढें उभ्या राहिल्या आहेत. बाहेर युद्ध चालूं आहे, तसेंच घरभेद्यांच्या कुटिल डांवपेंचांविरुद्धही डोळ्यांत तेल घालून उभें रहावें लागत आहे. अंतःकरणें उजाळून निघालेलीं असतांनाही 'ब्लॅक आऊट' पत्करून अंधारांत चांचपडावे लागत आहे. कार्यालयांत, कारखान्यांत, शाळा कॉलेजांत काम करतांना एक कान कामांत तर एक कान 'आकाशवाणी'कडे ठेवावा लागत आहे. पण कुठल्याही युद्धमान राष्ट्रांतल्या स्वाभिमानी नागरिकाला हें मोल द्यावेंच लागले आहे. द्यावेंच लागते. ह्या स्वाभिमानाच्या जीवावरच राष्ट्रें महान संकटांतूनही उभीं राहतात. विजयी होतात. ह्या युद्धमान अवस्थेंतून आपण सध्यां जात आहोंत. त्या अवस्थेची जी जी मागणी असेल ती ती पुरवीत आहोंत. ती पुरविणे हें आपलें कर्तव्य आहे असें मानीत आहोंत. ह्या कर्तव्यांतून आज एक नवा इतिहास घडतो आहे. आपणच त्याचे शिल्पकार आहोंत.

१९४७ सालीं आपण ह्या देशाचें स्वातंत्र्य संपादित केलें. तें करतांना आपण एक फार मोठी आणि ऐतिहासिक चूक केली— धर्मतत्वावर देशाची फाळणी मान्य करण्याची ! त्यावेळीं आपली आशा अशी होती कीं, फाळणीनें हिंदु-मुसलमानांचा प्रश्न कायमचा सुटेल. पण भारत द्वेषावरच जी फाळणीही जन्मली व जें राष्ट्र जन्मले, त्यानें ती आशा फोल ठरविली आहे. त्याचा तपशील आतां साऱ्यांना ठाऊक आहे. ताजा तपशील रणांगणावर रक्ताच्या शाईनें लिहिला जात आहे. आज 'लढके लेंगे हिंदुस्थान' ही १९४७ ची घोषणा जणुं पॅटन रणगाडे आणि सेबर जेट विमानांतून फेंकले जाणारे तोफ गोळे यांच्या आगीतून बरसत आहे आज 'जगा आणि जगूं द्या' अशी भारताची सदिच्छा क्षणा क्षणाला पायदळीं तुडवीत पाकिस्तानी सैनिक आमची भूमी बेचिराख करण्यासाठीं कटिबद्ध झाला आहे. हें 'धर्म कर्म' आहे 'जिहाद' आहे अशी त्याची श्रद्धा आहे. त्याला प्रेमानें जिंकण्याचा प्रयत्न आज फसला आहे. आणि गेल्या सतरा वर्षांतले सारे अपमान धुवून टाकण्यासाठीं भारतीय सेनादळें मातेला रुधिराची स्नानें घालीत आहेत. निषेध खलित्यांचे राजकारण संपलें. अर्ज विनंत्यांचे राजकारण खलास झाले. 'वाटाघाटी'चा वांझोटा घोळ (व खेळही) संपला. अनुनयवादी राजकारणाचा जमाना संपून आत्मबलाचा साक्षात्कार घडविणारा नवा इतिहास आज पंजावमध्यें, काश्मीरमध्यें लिहिला जात आहे. आपणच त्याचे शिल्पकार आहोंत.

हें युद्ध अनेक अर्थांनीं अभिनव आहे. अभिमानास्पद आहे. तें सुरू करतांना आम्हीं चर्चा, विनिमय वाटाघाटी वगैरे मार्ग अंचरले नाहींत. आमच्या भूमीवर आक्रमण झाले आणि आम्हीं वज्रमूठ उगारली. आमचे ब्रिटिश मित्र (?) डोळे वटारतील कीं काय ? अमेरिकन दूत रागावतील काय ? ह्या प्रश्नांची चर्चा करीत आम्हीं वाट पाहिली नाहीं. सारी सैन्यदळें शत्रूच्या मागें धांवलीं, **"प्रत्याक्रमण हें उत्तम संरक्षण"** हा युद्ध नीतीचा प्रमुख सिद्धांत आम्हीं कृतींत उतरवला. **"युद्ध शत्रूच्या भूमींत लढविले जावें"** म्हणजे जास्तीत जास्त हानी झाली तरी ती त्याची होते, करतां येते ही रण-नीति आम्हीं लढविली आणि लाहोर, सियालकोट, जम्मू, सिंध हैद्राबाद ह्या विविध आघाड्यांवर आज आम्हीं शत्रूची जबर हानी घडवून आणली आहे. ह्या साऱ्या 'कृति' आम्हीं अतिशय योग्य वेळीं व वेगानें केल्या, त्यामुळें आधुनिक युद्धांतलें एक असामान्य गतीचें युद्ध (Speedy War) म्हणून ह्या युद्धाचा उल्लेख सारे रणनीतिज्ञ करीत आहेत. भारताच्या विमानदलानें बजावलेली असामान्य कामगिरी ही तर केवळ आपल्याच नव्हे तर पाश्चात्यांच्याही कौतुकाचा विषय बनली आहे. आज आम्हीं जो विजय संपादन केला आहे त्यांतला मोठा वांटा विमानदलाचाही आहे. त्यांत अभिमानाची गोष्ट अशी कीं,




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

रु. १००; रु. ७५, रु. ५० ची बक्षिसें मिळवा

दिवाळी अंकाच्या वाचकांसाठी एक अभिनव स्पर्धा

प्रवेश फी वगैरे कांहीं नाहीं, पण त्यासाठीं

'दीपावली'चा

*दिवाळी अंकच वाचायला हवा*

**बंगलोरला तयार होणाऱ्या ह्या 'भारतीय' विमानांनीं अमेरिकन पॅटन्स रणगाडे व अमेरिकन विमानांशीं तोडीस तोड सामना दिला व आपलें श्रेष्ठत्व सिद्ध केलें आहे. आपल्या वैमानिकांचें हें कसब जगांतल्या रणनीतिज्ञांनींही मान्य केलें आहे.** भारतीय सेनेच्या आणि वैमानिकांच्या कर्तृत्वानें आज भारतीय आकाशांत व तांबड्या-काळ्या मातींत एक नवा इतिहास घडला आहे. आपण त्याचे शिल्पकार आहोंत. साक्षीदार आहोंत.

मरगळ संपली. मतभेद संपले. भांडणें संपली—पक्षभेद संपले. मोर्चे, संप सरले. संत फत्तेसिंहांचें उपोषण स्थगित झाले. 'भूक' भागत नसूनही 'भूक मोर्चे' मागें आले. भाषावाद संपला. 'गोव्या'चे भांडण विरले. 'बेळगाव कारवार' आहे तिथेंच सुर्त राहूं देत ही भूमिका आली. निवडणुका मागें गेल्या. त्यामुळें येणारी शिवीगाळ सरली. 'रक्त' देणाऱ्यांसाठीं रक्तदान करणाऱ्या स्त्री-पुरुषांच्या रांगा लागूं लागल्या. सैनिक नोंदणी केंद्रांसमोर यात्रा भरूं लागल्या. एक वृत्तपत्र दहा जणांना पुरूं लागले. 'फुकटचा' म्हणून कुणींकुणाला हिणवीनासा झाला. 'आम्हीं असेच सतत मार खाणारे' ही भावना ह्या युद्धांतल्या बॉम्बफेकींत जळून गेली. काश्मिरी मुसलमानापासून ते मद्रासच्या अय्यरांपर्यंत सारेजण एकाच भावनेनें भारलेले दिसताहेत "आम्हींही हें करूं शकतो. हें करण्याची ताकद ह्या मातींत पूर्वी होती तशीच ती आजही आहे. अखेर सबळाची शांति हीच खरी शांति. दुर्बलाची अहिंसा ही अधिक 'हिंसा' घडवून आणते हेंच खरे! आज एक नवी जाग येत आहे. स्वप्नरंजन संपले आहे. वांझोटा आशावाद सरला आहे. दुसऱ्याच्या सत्प्रवृत्तीवर 'जादा' भर देऊन कर्तृत्वशून्य जीवन जगणारी परंपरा खंडित झाली आहे. आज भारताच्या इतिहासाचे एक तेजस्वी, गौरवशाली अस्मितापूर्ण असें नवें पर्व सुरूं झालें आहे. भारताच्या राष्ट्रपुरुषाचें हें **विराट रूप, 'एक नवें' 'महाभारत'** घडवून जाते आहे. आपण त्याचे शिल्पकार आहोंत. साक्षीदार आहोंत.

—अनेक पराजय पचवूनही अंतिम विजय मिळेपर्यंत हें **'महाभारत'** आम्हीं लढविलेच पाहिजे. कालपुरुषानें आपल्याकडे सोंपविलेली ती एक अटळ अशी कामगिरी आहे. वारसा आहे.

## शत्रु-मित्र विवेक

**सांप्रत** चालूं असलेल्या लढाईच्या पार्श्वभूमीवर आज एका वेगळ्याच विषयाची चर्चाहि अपरिहार्य झाली आहे. ती म्हणजे शत्रु-मित्र विवेकाबाबतची! वाऱ्यावादळांत सारें ढवळून निघते. संकटांतच श्रद्धा-निष्ठांची कसोटी लागते आणि 'गरजे'पोटी शत्रुमित्रांची पारख करण्याची संधि गवसत असते. आजच्या आपल्या सत्त्वपरीक्षेंतही ह्या साऱ्यांची कसोटी लागत आहे. ( ही एक फार चांगली गोष्ट आहे. आतां तरी स्वप्नरंजन संपेल) "युद्ध नको," 'सीज् फायर' ही विनंती आज सारीं राष्ट्रें मोठ्या मानभावीपणानें (व कांहीं प्रामाणिकपणानेंही) आम्हांला करीत आहेत. तें करतांना जीं कांहीं भाष्यें केलीं जात आहेत त्यांतून ती 'मनें' उघडीं होत आहेत. 'हेतु' स्पष्ट होत आहेत. कांहीं राष्ट्रांचे रंग आतां (लाल झाल्यानें ) स्पष्ट झाले आहेत. 'मलेशिया' ला भारतानें पाठिंबा दिल्यानें डॉ. सुकार्नो हे भारताचे शत्रु झाले आहेत. 'जळीं स्थळीं' त्यांना 'भारतद्वेष' दिसतो. मग सामने असो कीं, 'अल्जियर्स'ची परिषद असो. चीननें आपले दांत कधींच दाखवले आहेत. काश्मीरचे तथाकथित 'मुक्त-सैनिक' ही चीनी योजना होती. कारण कम्युनिस्ट कधीं आक्रमण करीत नाहींत. मुक्तिसैनिकांकरवी काम भागलें नाहीं तर पाकसेना आणि मग मित्रराष्ट्राची 'गरज' भागविण्यासाठीं चिनी 'स्वयंसेवक' अशी योजना ठरलेली दिसत. ह्या दोन अनिष्ट ग्रहांची युति ही तर भारताच्या राशीला लागलेलीच आहे. त्यांनीं विरोधी भूमिका घेतली तर आश्चर्य नाहीं. पण इराण व तुर्कस्ताननें ह्या लढ्यांत भारत विरोधी भूमिका घेतलेली दिसते. ह्यांत पाकिस्तानच्या 'धार्मिक' प्रचाराचा परिणाम झालेला दिसतो. हेंच आवाहन नासेरनाही करण्यांत आले. पण 'मुस्लिम ब्रदरहुड'नेंच नासेरच्या खुनाचा कट केलेला त्यांना ठाऊक असल्यानें 'मुस्लिम'हें व्यापक आवाहन तेथें फुसके ठरले. भारत 'मलेशिया'च्या प्रथमपासून पाठीशीं राहिला. पण 'मलेशिया'ची भूमिका ही फारशी स्पृहणीय नाहीं. सर्वांत खेद होतो तो ब्रिटन अमेरिकेनें घेतलेल्या भूमिकेचा! त्यांतही ब्रिटिश राष्ट्रकुलाचे सभासद असलेलें आपलें राष्ट्र असतांना ही भूमिका स्पृहणीय खास नाहीं. इंग्रज धूर्त खरे. देश सोडतांना त्यांनीं अशा कांहीं जखमा केल्या आहेत कीं, त्या अजूनही वहातच आहेत. **काश्मीरची जखम** हा ब्रिटिशांच्या कुटिल राजनीतीचा परिपाक आहे. तेथें आक्रमक कोण हें स्पष्ट असतांनाही **'युद्ध थांबवा'** असें सांगतांना ब्रिटिशांनीं जणुं धमक्या देण्यास प्रारंभ केला आहे. **"युद्ध साहित्य वापरूं नका, युद्ध साहित्य परत करा, मदत बंद"** अशी भूमिका त्यांनीं व्यक्त केली. अमेरिकेनें **"आर्थिक, सैनिकी मदत नाहीं"** "असें जाहीर केलें आहे. अमेरिकन युद्ध साहित्य पाक वापरीत असतांनाही अमेरिका दटावते भारताला! रणगाडे








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

वापरले हा दुय्यम मुद्दा आहे असें अमेरिकेला वाटतें. पाकला जाब विचारण्याचें धाडस ती करीत नाहीं. उलट भारत-पाकला एकाच उंचीवर बसवून **"युद्ध थांबवा नाहीं तर मदत नाहीं"** अशी विचित्र भूमिका अमेरिकेनें घेतली आहे. अमेरिकेचा भारतानें कुठेंही विश्वासघात केला नाहीं. मिळालेलीं शस्त्रें युद्धांत वापरलीं नाहींत. तरीही दोष भारतालाच दिला जात आहे. वस्तुतः पाकिस्तानला अमेरिकेनें 'आमचें रण साहित्य वापराल तर खबरदार' म्हणून दटावायला हवें होतें. परंतु तसें करण्याऐवजीं अमेरिका भारतावर सूड उगवूं पहाते आहे. आयसेनहॉवरनें दिलेलें आश्वासन हें अमेरिकन राष्ट्रपतींचें आश्वासन आहे. **'अमेरिका'** ह्या प्रगत राष्ट्राचें तें आश्वासन आहे. त्याची शान प्रे. जॉन्सन कां राखीत नाहींत? कदाचित् द. व्हिएटनामच्याबाबत शास्त्री शासनाची भूमिका जॉन्सनविरोधी असल्यानें त्याचा हा सूड तर नसेल? सैनिक व अद्यावत् शस्त्रास्त्रें तेथें वापरणारी अमेरिका भारत आपल्यावरील आक्रमण मोडून काढण्यासाठीं शस्त्राचार करीत असतांना भारताला मात्र म्हणते आहे "युद्ध थांबवा! आक्रमक कोण हा महत्त्वाचा मुद्दा नाहीं!" कदाचित् 'काश्मीर' मुक्त झालें तर कम्युनिझमविरोधी एक 'बेस' जाईल अशी अमेरिकेला भीति वाटत असावी. पण आजचे पाक राज्यकर्ते हे माओ-च्याओ चे 'गुलाम' झाले आहे हें त्यांच्या ध्यानीं येत नाहीं काय? काश्मीरबाबतचा चीन-पाकिस्तान करार हें त्याचें ढळढळित उदाहरण आहे. ऐन रणधुमाळी चालूं असतांना **चेन यी** रावळपिंडीला येतात. पाक गनीमांना चिनी सेनानी शिक्षण देतात. चीन पाकच्या बाजूनें युद्धांत उतरण्याची उघड धमकी देतो हें सारें अमेरिकेला दिसत नाहीं असें कसें म्हणावें? आज पाकचा विजय व भारताचा पराजय याचा अर्थ लोकशाहीचा अस्त व कम्युनिझम प्रणित झुंडशाहीचा विजय असाच होत नाहीं काय? हें होणें अखेर जागतिक लोकशाहीचे प्रणेते—प्रवक्ते म्हणविणाऱ्या ब्रिटन-अमेरिकेला अभिप्रेत आहे? मंजूर आहे? रशिया, चीन व भारत हे तीन खंडप्राय देश 'लाल' होणें याचा भयानक अर्थ अमेरिकेला समजत नाहीं? युद्ध अखेर राष्ट्रपति म्हणतात त्याप्रमाणें निर्णायक लोकशाहीसाठीं चालूं आहे हें ह्या राष्ट्रांनीं जाणलें पाहिजे. हा समतोल रशियानें कांहीं हेतूनें कां होइनां, पण ओळखलेला दिसतो. चिनी विस्तारवादाची गंभीर दखल त्यानें घेतली आहे.

हा झाला बाहेरच्या शत्रु-मित्रांचा विचार! घरांतले शत्रु छुपे—त्यामुळें अधिक भयानक! ते मशिदींत शस्त्रें जमवूं शकतात. गुप्त बातम्या फोडूं शकतात. फोटो, नकाशे पुरवूं शकतात. मोक्याच्या जागा उडवूं शकतात. अशीं माणसें व प्रकार उघडकीस येत आहेत. हा लढा सर्वच मुसलमानांविरुद्ध नाहीं. पण राष्ट्रनिष्ठा नसलेल्यांबाबत जरुर आहे. आईशीं कृतघ्न असणारांना ह्या देशांत शासनच हवें. सामान्य नागरीकही ह्याबाबत चोख कामें बजावीत आहेत. छत्रीधारी सैनिकांवर लक्ष ठेवणें. युद्धचर्चा जपून करणें (वा मुळींच न करणें) सैल न वागणें, नागरी संरक्षण दळांत सामील होणें हीं कामें मित्र करीत आहेत. आज कांहीं माणसें जणुं आमचे सेनापति व वैमानिक ह्यांच्याशीं चर्चा करूनच सर्व हालचाली करतात असा आव आणून बोलतांना दिसतात. पैजाही लावतात. ते कळत नकळत ह्या युद्धमान राष्ट्राची हानी करतात हें त्यांनीं ध्यानीं घ्यावें. प्राणपणानें राष्ट्र लढत असतांना काळाबाजार, सांठेबाजी करून सामान्य जनतेला नाउमेद करणारे व्यापारी हे पर्यायानें देशाचें शत्रुत्व करीत आहेत हें ध्यानीं घेतलें जावें. इतकीं वर्षे आपण हक्कांची भाषा बोललो. आतां कर्तव्याची भाषा सुरूं झाली पाहिजे. द्रव्य, कपडे, रक्तदान ह्या गोष्टी तर झाल्याच पाहिजेत. आज आमच्या मुसलमान बांधवांची 'राष्ट्रनिष्ठा' कसोटीला उभी आहे. ते जर ह्या देशाचे खरे पाईक असतील तर त्यांनीं **'मशिदी'** हे देशाचे **'संरक्षक किल्ले'** बनवले पाहिजेत, घातपाती कृत्यांचे देशबुडवे अड्डे नव्हेत. जिचें अन्न ते खातात, जिचें स्तन्य ते पितात त्या मातृभूमीची ही मागणी आहे. त्यांत त्यांचेच हित आहे हे गेल्या दोन महिन्याच्या इतिहासाचें त्यांना सांगणें आहे.

**—सारस्वत**


# भारतीय जवानांचा विजय असो!

**असीम निर्धारानें युद्ध आघाडीवर लढा देण्याऱ्या आपल्या शूर सैनिकांना तुमची साथ द्या....**

स्वातंत्र्य—निष्ठेच्या सत्व परिक्षेच्या या काळांत संरक्षण कार्यासाठीं रक्त, अश्रु, श्रम यांचा ओघ सतत ठेवण्यासाठीं....

## संरक्षण निधींत सढळ हातानें भर घाला

दलाल आर्ट स्टूडिओतर्फे जनतेस आवाहन






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

(पष्ठ ८ वरून–काश्मीर )

सयुक्तिक ठरतें. आधुनिक युद्धांत वायुसेना अग्रगण्य समजण्यांत येते. परंतु भारताच्या चीन आणि पाकिस्तान ह्यांना लागून असलेल्या सरहद्दी विचारांत घेता, स्थलसेनेलाहि प्राधान्य द्यावें लागतें.

युद्धशास्त्र हा एक बुद्धिबळाचा खेळ आहे. संभाव्य शत्रूकडून हल्ला झाल्यास त्याला काय उत्तर द्यावयाचें ह्याचा आधीपासुन विचार करावा लागतो. ह्या विचारांना मूर्त स्वरुप देण्यास शत्रूच्या संरक्षण दलांची इत्थंभूत माहिती असणें जरूर असते. विशेषत: शत्रूच्या सैन्याचे आंकडे आणि त्याचे जवळ असलेली शस्त्रसामुग्री ह्याच्या तपशीला खेरीज त्याविरुद्ध योजिल्या जाणाऱ्या उपायांची तयारी करता येत नाहीं. भारतासारख्या नवोदित राष्ट्राला ही तयारी करणें जड गेलें. काय पाहिजे आहे हें माहिती असून सुद्धां शस्त्रास्त्रांचे अभावी भारताला नमतें घ्यावें लागले आणि वेळप्रसंगी नामुष्कीहि सहन करावी लागली. चीनच्या आक्रमणानंतर भारताला भिक्षापात्र हातांत घेऊन पश्चिमी राष्ट्रांच्या दारोदारीं शस्त्रास्त्रांकरितां याचना करावी लागली. गेल्या दोन तीन वर्षांत परिस्थिति बरीचशी सुधारली आहे. ह्याची प्रचीति सध्या काश्मीरमध्यें चाललेल्या लढ्यामध्यें येते.

संरक्षक दलांचे पुन्हा दोन भाग पाडावयाचे म्हणजे, मनुष्यबल आणि शस्त्रास्त्रे असे पाडण्यांत येतात. हे दोन्हीं एकमेकाला पूरक असतात. असे जरी असले तरी मनुष्यबल केव्हांही श्रेष्ठ ठरते. नि:शस्त्र माणूस हिंमत असेल तर सशस्त्र शत्रूला कांहीं तरी युक्तीने हरवूं शकतो. ह्याचे उलट सशस्त्र मनुष्य हिंमत नसेल तर आधीच गर्भगळीत होतो. ह्यासाठींच आपल्या सेनांच्या शिक्षणाचे प्रमुख अंग म्हणजेच त्यांचे मनोधैर्य बळकट करणे आणि त्यांचीं हिंमत वाढविणें. ह्याचा अर्थ "हिंमत है मर्दा तो बंदा है खुदा" ह्या उक्तिवरून स्पष्ट होतो. लढणाऱ्या शिपायांना हिंमती इतकीच नेतृत्वाची जरुर असते. हे नेतृत्व भाषणामुळें येत नसून नेत्यांना म्हणजेच अधिकाऱ्यांना स्वत:च्या गुणावर आणि त्याचप्रमाणें आपल्या हाताखालच्या शिपायांचा आपणावरती विश्वास निर्माण करूनच मिळवावयाचे असते. आपले तरुण किती उत्कृष्ट नेतृत्व करू शकतात हे भारताच्या संरक्षण दलाने सर्व जगास दाखवून दिले आहे.

मनुष्य बलाइतकीच महत्वाची बाब म्हणजे शस्त्रास्त्र सामुग्री. युद्धनीतीचे एक मूलतत्व म्हणजे प्रत्येक राष्ट्राने शस्त्रास्त्र संपादनामध्यें स्वावलंबी असावे. गेल्या १८ वर्षांत ह्या बाबतीत भारत किती स्वावलंबी झाला आहे ह्याची सर्वसाधारण जनतेला कल्पना येत नाहीं. परंतु आता ही गोष्ट जगमान्य झाली आहे की, आपण आता बव्हंशीं स्वावलंबी झालेलो आहोत आणि आपले पाऊल पुढेच पडत चालले आहे.

शस्त्रास्त्रावरील संशोधनामध्यें सर्व पुढारलेली राष्ट्रे निमग्न आहेत. सर्वांचा उद्देश एवढाच कीं, थोड्या खर्चांत जास्तींत जास्त संहारक शस्त्रे निर्माण करणें. सर्व राष्ट्रें संशोधनाच्या सारख्याच पातळीवर असणे शक्य नाहीं. अनुकरण उघड उघड अथवा अन्य मार्गानीं होतच राहाते. म्हणून भारत पाश्चिमात्यांचे नुसतेच अनुकरण करीत आहे, ह्या बोलण्यांत कांहींच अर्थ नाहीं. असो.

भारताला आणि पाकिस्तानला शस्त्रास्त्रे विशेषत: इग्लंड आणि अमेरिका ह्यांनीच पुरविली. ह्यामध्येही सवता सुभा झाला. कांहीं विशिष्ट जातीची वरचढ विमाने फक्त पाकिस्तानला पुरविली गेली. पण त्या विमानांची आपल्या शूर वैमानिकांनी जुन्या विमानांचे सहाय्याने कशी धूळधाण उडविली हे आपण वाचीत आहोतच. तेव्हां मागे लिहिल्याप्रमाणें शस्त्रास्त्र बलातील उणीव आपल्या शूर वीरांनीं आपल्या धाडस आणि हिंमतीच्या जोरावर पूर्णतय: भरून काढली आहे.

भारताला रशियाकडूनहि बरीचशी मदत मिळाली आहे आणि मिळत आहे. हा सुद्धां एक राजकारणाचा खेळ आहे. चीन आणि रशिया यांचे बिनसल्यामुळें चीनजवळ विमानांचे सांगाडे असून त्यांच्या जीर्ण झालेल्या एंजिनांची बदली अथवा दुरूस्ती करण्यास, रशियाने जरुर ती सामुग्री दिलेली नाहीं.

भारताचे संख्याबल आणि शस्त्र सामुग्री पाकिस्तानच्या आणि चीनच्या तुलनेमध्यें किती जास्ती अथवा कमी आहे ह्याची चर्चा करणे योग्य ठरणार नाहीं. तरी पण ह्या बाबींचा संपूर्ण विचार करूनच संरक्षण पोट समितीच्या घतलेल्या निर्णयाचे प्रात्यक्षिक म्हणजेच आपली सध्याची पाकिस्तान विरुद्ध मोहीम.

## युद्धामध्यें आपणास बाहेरून मिळणारी मदत

अशी मदत प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष असू शकते. इंग्लंड, अमेरिका अथवा इतर पाश्चिमात्य राष्ट्राकडून, पाकिस्तान विरुद्ध भारतास मदत मिळणें असंभाव्य आहे. तरीसुद्धां शस्त्रास्त्रांची प्रत्यक्ष मदत पाकिस्तानला मिळणें जरी बंद झाले तरी आपला बराचसा कार्यभाग होणे शक्य आहे.

चीन विरुद्ध रशियाने जरी आपणास प्रत्यक्ष मदत केली नाहीं आणि चीनला ऐनवेळेस शस्त्रसामुग्री देण्याचे नाकारले तर ती सुद्धां आपणास प्रत्यक्ष मदत म्हणूनच ओळखावी लागेल. चीनच्या साम्राज्यवादाला आळा बसावा ही इग्लंड अमेरिकेची मनापासून इच्छा. तेव्हां चीनने जर पुन्हां आक्रमण केले तर अमेरिका भारताला मदत करील हे चीनी नेते ओळखून आहेत. तसेच भारतावरील चीनच्या आक्रमणाची संधी साधून अमेरिकेचे पाठबळाने चांग कै शेखचा चीन, लाल चीनवर आक्रमण करण्याचीही शक्यता, लालचीन विसरू शकत नाहीं. हे सर्व परीक्षण झाले. पण प्रत्यक्षात काय घडेल हे हवामानाच्या अंदाजाप्रमाणें निरुपयोगी ठरेल. लिहिण्याचा उद्देश इतकाच कीं, भारताने चीनचे संभाव्य आक्रमण लक्षात घेऊनच भारती फौजांचा आणि हवाई दलाला आगेकूच करण्याचा हुकूम दिला.

पाकिस्तानच्या लढ्यामध्यें भारतास मिळत असलेल्या आणखी एक अप्रत्यक्ष मदतीचा उल्लेख करणे जरुर आहे. पाकिस्तानच्या उत्तरेस अफगाणिस्थान आहे. दोन्हीं देश धर्माने मुसलमान असले तरी राजकीय संबंधांत त्यांच्यामध्यें वितुष्ट आहे. अफगाणिस्तान "पुक्तूनिस्तान" म्हणजे पठाणांच्या स्वतंत्र देशाच्या मागणीचा पाठपुरावा करीत आहे. हा प्रदेश पश्चिमेस बलुचिस्तान पासून पूर्वेस मलाकंडपर्यंत पसरलेला आहे. हा प्रदेश मुख्यत: पाकिस्तानच्या हुकुमतीखाली असल्यामुळें त्यांना स्वातंत्र्य देण्यास पाकिस्तानचा विरोध आहे. काश्मीरमध्यें सार्वमत घ्यावे असा पाकिस्तानचा, गैरवाजवी असला तरी, अट्टाहास आहे. पण त्याविरुद्ध पठाण सार्वमताने मागत असलेली स्वतंत्रता देण्यास पाकिस्तान तयार नाहीं. सध्याची पाकिस्तानची अडचण लक्षांत घेऊन पठाणांनीं नेमकी हीच संधि आपल्या स्वातंत्र्य युद्धाकरितां साधिली आहे. पठाणांनीं पाकिस्तानच्या बन्नू, दत्ताखेलसारख्या महत्वाच्या ठाण्यावर बंडाची झोड उठवून दिली आहे. उत्तरेस मदत पाठविली तर भारतासमोर सैन्याचे अभावी नांगी टाकावी लागते. बरे कुमक पाठविली नाहीं तर पठाण स्वतंत्र होतात आणि पाकिस्तानचा एक हिस्सा पाकिस्तानापासून निराळा होतो. हा पेचप्रसंग कसा सोडवावयाचा हे प्रेसिडेंट अयूब आणि जनाब भूत्तोच जाणोत.

लोकशाहीची इमारत लोकमताच्या पायावरच उभारिली जाते. लोकमत म्हणजेच जनतेने निवडून दिलेली राजवट. कोणत्याही


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

अनुक्रमणिका

राष्ट्रामध्यें सगळचात शक्तिमान गट संरक्षण दलांचा असतो. जगांतील राज्यक्रांत्या त्या गटाकडून अथवा त्यांचे सहाय्याने झालेल्या आहेत. म्हणूनच भारताच्या संविधानात संरक्षण दलावर लोकसभेचे नियंत्रण आणि वंधन घातले आहे. संरक्षण दलांचा कायद्यावर लोकसभेस दरवर्षी शिक्का मोर्तंव करावे लागते. असे जर केले नाहीं तर तीन्हीं संरक्षण दले वेकायदेशीर जमाव ठरतात. लोकसभेने हे संरक्षण दलावरील नियंत्रण संरक्षण मंत्र्याकडे सोपविलेले असते म्हणूनच युद्ध पुकारावयाचे अथवा नाहीं हे मंत्र्यानी म्हणजे संरक्षण पोट समितीने ठरवावयाचे असते. धोरण मंत्रिमंडळ ठरवून देते परंतु प्रत्यक्ष कृति सेनापतींवर सोपविलेली असते.

सेनापतींची सल्लागार समिती आणि संरक्षण पोट समिती ह्यांचेमध्ये मतभेद झाल्यास मंत्रिमंडळाचा निर्णय अखेरचा ठरतो. सेनापतींनी त्या धोरणामुळें काय धोके निर्माण होतील ह्याची जाणीव करून दिल्यानंतर मंत्रिमंडळाच्या धोरणाची अंमलवजावणी करण्याखेरीज त्यांना गत्यंतर उरत नाहीं. अशा धोरणापासून अनर्थ निर्माण झाल्यास सेनापती अर्थातच जवाबदार राहात नाहींत. १९६२ सालीं चीनी आक्रमणाचे वेळीं असेच कांहीं झाले असण्याची शक्यता आहे.

आपले राज्यकर्ते अननुभवी आहेत म्हणून असे पेचप्रसंग निर्माण होतात असेंही समजण्याचे कारण नाहीं. दुसऱ्या महायुद्धातील असे कित्येक दाखले देतां येतील कीं, विन्स्टन चर्चिल सारखे राजकारणी धुरंधर आणि फील्ड मार्शल मॉंटगॉमरी सारखें सुप्रसिद्ध सेनापती ह्यांचेमध्येही मतभेद झाल्याचे दाखले आहेत. असेच मतभेद प्रेसिडेंट रूझवेल्ट आणि जनरल आयसेनहॉवर ह्यांचे मध्येही झालेले होते. प्रत्येक वेळीं सेनापतीनाच माघार घ्यावी लागली होती.

लोकनियुक्त राज्यकर्त्यांना परराष्ट्रीय राजकारण तर खेळावे लागतेच पण त्याशिवाय त्यांना आपल्या देशाच्या लोकमतावर सुद्धां सदैव लक्ष ठेवावें लागतें. कारण उघड आहे. लोकनियुक्त पुढाऱ्यांना आपले आसन पुढच्या निवडणुकींत स्थिर करावयाचे असते. त्याकरितां जरुर पडल्यास त लोकहित न पहाता केवळ आपल्या पक्षाचेच हित पहातात. ह्याचे दुसरे इतिहासातले नमूद केलेले एक उदाहरण म्हणजे अमेरिकेचे दुसऱ्या महायुद्धाचे अखेरीस रूझवेल्ट ह्यांना लष्करी तज्ञांनी असा सल्ला दिला होता कीं, अमेरिकेच्या कांहीं फौजानीं बालकन देशातून चढाई करून जर्मनीवर पाठीमागून हल्ला करावा. ह्यामुळें जर्मनी बरोबरील युद्ध ४-५ महिन्यांत संपले असते आणि प्राणहानी कमी झाली असती. अमेरिकन अध्यक्षांची निवडणूक जवळ आली होती आणि पुन्हां निवडून यावे म्हणून रूझवेल्ट यांनीं लोकमताला खूष करण्याकरितां तज्ञांचे मत फेटाळून लाविलें आणि निष्कारण फ्रान्समध्येंच आणखी फौजा उतरविण्याचा आदेश दिला. रूझवेल्ट पुन्हां निवडून आले. पण युद्ध ४-६ महिन्यांनीं लांबले. इतिहासांत अशी अनेक उदाहरणे सापडतील. ह्या नियमाला अपवाद फक्त हुकुमशाही खालील देश हे निराळे सांगणे नकोच.

सर्व कांहीं साधू नाहीत. तेव्हां राज्यकर्ते आपले आणि आपल्या पक्षाचे हित पहाणार ह्याबद्दल वाद नाहीं. परंतु राज्यकर्त्यांनीं सदैव देशाचे हित अग्रस्थानी ठेवावे असे वाचकांचे बरोबरच लेखकाचेही मत आहे

काश्मीरच्या प्रश्नाची सुरवातीस लिहिल्याप्रमाणें एका निराळ्या दृष्टीकोनांतून स्थूलमानाने चर्चा केली. आपणास सर्व कांहीं समजते व राज्यकर्ते चूक आहेत असा विचार करणे चुकीचे आहे असें लेखकास वाटते. कारण राज्यकर्त्याजवळ असलेली गुप्त माहिती सर्वसाधारण जनतेस नसते, आणि ती गुपितें उघड करणे देशहिताच्या दृष्टीने श्रेयस्कर नसते. लेखकास इतकेच सांगावयाचे आहे कीं, आणीबाणीचे प्रसंगी आपण आपसातील सर्व मतभेद विसरून राज्यकर्त्यास संपूर्ण सहाय्य व मदत करावी.

हिंदी संरक्षक दलाची जितकी प्रसंशा करावी तितकी थोडीच. त्यांच्या बहादुरीबद्दल ते दोन्हीं महायुद्धांत प्रसिद्ध होतेच. परंतु त्या शौर्याला आता स्वदेशाच्या प्रेमाची आणि देशभक्तीची जोड मिळाली आहे. राज्यकर्त्यांनी अशा विनतोड सैनिकांच्या हातामध्यें जरुर ती शस्त्रास्त्रें दिली तर आपले संरक्षक दल सर्व जगाविरुद्ध भारताच्या संरक्षणाकरिता हिंमतीनें उभे राहील ह्याबद्दल लेखकाला संदेह नाहीं.

रामायण संपले आता शेवट काय ? लेखकाचे प्रांजल मत असे आहे कीं ही कुस्ती—पाकिस्तानबरोबरची—चितपट होणार नाहीं. ऐनवेळेस म्हणजे घास तोंडापावेतो आल्यानंतर पंच कुस्ती थांबवितील. पाकिस्तानला दहशत तर बसली आहेच. परंतु जोपर्यंत पाकिस्तानी राजवट केवळ हिंदद्वेषावरच उभारलेली राहील तोपर्यंत ही परिस्थिती बदलणार नाही. ●●●

बेडेकर उत्पादनें-एक उत्कृष्ट खरेदी.




बेडेकर उत्पादनें म्हणजे नेहमीच एक उत्कृष्ट खरेदी ठरत असते. तुमच्या पैशाचें पूर्ण मोल तीं देत असतात. उच्च दर्जाचे कच्चे पदार्थ आणि अनुभवसिद्ध पद्धति यामुळें बेडेकर उत्पादनें दर्जा आणि चव या दोन्ही बाबतींत अग्रेसर असतात.
बेडेकर उत्पादनें—उत्कृष्टपणाची हमीच !

बेडेकर मसालेवाले
मुगभाट मुंबई ४ शाखा—ठाकुरद्वार, फोर्ट परेल, दादर, पेरुगेट पुणें २





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

( पृष्ठ १० वरून–धुकें )

मी बाहेर काढली आणि तीमध्यें कोंबूं लागलों.

ती पटकन् पुढें आली आणि तिनें माझा हात धरला.

"No. No. No. You will spoil them."

मी तोंडावर प्रश्नचिन्ह उभें केलें. पिशवीची परत घडी केली.

"Shall I make it a one basket for you ?"

मी फक्त मान हलवली.

तिनें पटकन् पलीकडच्या टेबलावर असलेल्या पांढऱ्या शुभ्र, लांबरुंद पण पातळ अशा कागदांच्या चळतींतून एक कागद सर्रदिशीं ओढला. तो ओढतांना तिच्या निळ्या रेशमी सुळसुळीत साडीचा पदर खालीं घरंगळला. तिचें लक्ष त्याकडे नव्हतें. पिशवींत कुस्करल्या जाणाऱ्या फुलांसाठीं ती जपत होती. ती तशीच माझ्याजवळ आली. माझ्या हातांतील फुलांच्या त्या दोन्हीं गुच्छांभोंवतीं तिनें तो पातळ कागद लपेटला. तो लपेटतांना हात माझ्या हातांभोंवतींदेखील लपेटून गेला. झोंपी जाणाऱ्या एकाद्या बाळाला वत्सलतेनें थोपटावें तशी ती त्या कागदावरून हात फिरवीत होती. त्यांत ती तन्मय झाली होती. माझ्याभोंवती मी रुमालावर शिंपडलेल्या मिस्चिफ्च्या सुगांधाचें वलय पसरलें होतें. ती कागद लपेटत होती त्यावेळीं तिनेंही लावलेल्या सेंटचा सूक्ष्म-सुगंध त्या वलयांत मिसळून गेला. इतक्यांत काय झालें कुणास ठाऊक, तिचा पदर तर घरंगळत होताच, पण तिची सुळसुळीत साडीही सुटली. तिची एकदम धांदल उडाली. माझ्याभोंवतीं तें दुकान गरगर फिरूं लागलें. तें धुकें, ती गोड सकाळ, तीं रंगीबेरंगी ताजी फुलें, ती दुकांनातील शीतलता, ती रेशमी सुळसुळीत साडी, तिची टवटवी, फुलांना बाळासारखें थोपटणारे मऊमऊ हात हें सारें माझ्या भोंवतीं गिरक्या घेऊं लागलें. मी पैसे चाचपूं लागलों, त्यावेळीं ती दूर अंतरावर पाठमोरी उभी राहून साडी सांवरीत होती. माझ्या भोंवतींची गिरकी थांबूं लागली होती आणि फार वर्षांपूर्वी वाचलेल्या संस्कृत वाङमयांतील एक श्लोक माझ्या-भोंवतीं लपेटूं लागला.

ती पुनः हंसतमुखानें पुढें आली. मी तिच्या हातावर पैसे ठेवले.

"थँक्यू !" ती पुनः हंसत म्हणाली.

त्यां दोन्हीं गुच्छांभोंवतीं हलकेंच हात टाकून मी बाहेर पडलों. समोरून येणाऱ्या टॅक्सीला हात केला.

टॅक्सी पुढें पुढें जाऊं लागली तसतसा मी वळून वळून त्या दुकानाकडे पाहात होतो. अंतराअंतरानें धुक्याचा पडदा जाड जाड होत चालला होता आणि ती त्या धुक्या-मागें विरत चालली होती.

त्या पुष्पगुच्छांना हळूवारपणें कुरवाळत, त्यांचा सुगंध उत्कटतेनें नाकांत सांठवत मी सीटच्या पाठीवर रेललों नि पुटपुटलों, "या देशांत संस्कृतचें अध्ययन अधिक जोरानें व्हायला पाहिजे...."

●●●

---

# सामार पोंच

**मौज प्रकाशन, मुं. ४**

**नवीन मळवाट**
लेखक—शरच्चंद्र मुक्तिबोध
मूल्य —६ रु.

**माझें संगीत**
लेखक—केशवराव भोळे
मूल्य —१० रु.

**अमेरिकन चित्रकला**
लेखक—जेम्स थॉमस फ्लेक्सनर
अनु:—माधव आचवल
मूल्य —६ रु.

**एटू लोकांचा देश**
लेखक—विंदा करंदीकर
मूल्य—१ रु.

**भटक्याचें भविष्य**
लेखक—सई परांजपे
मूल्य—०. ७५ रु.

**भारतीय ग्रंथभवन प्रकाशन**

**संदर्भ साह्य**
लेखक—वा. पु. कोल्हटकर
त्र्यं. ह. लागू
मूल्य—२-५० रु.

**ग्रंथपालनाची तोंडओळख**
लेखक—रघुनाथ पारखी
मूल्य—२-५० रु.

**ग्रंथालय गौरवग्रंथ**
लेखक—अ. का. प्रियोळकर
दि. वि. काळे

**साक्षात्कार**
लेखक —वि. वा. पत्की
मूल्य—६ रु.

**मनस्विनी**
लेखक—शालिनी हळदीपूरकर
मूल्य—६ रु.

**नागरिक शास्त्र व भारतीय शास्त्र**
लेखक —प्रा. रमेश गुप्ते.
मूल्य—४ रु.

**पद्यसर्वस्व**
संपादक—रामदास डांगे
प्रभाकर मांडे

**तुझं कांहीं माझं कांहीं**
लेखक —वा. शि. आपटे
मूल्य—६ रु.

**धूसर ढग**
लेखक—द. पां. पेंडसे.
मूल्य—४ रु.

**बन्सी भैय्या**
लेखक—गो. गं. पारखी
मूल्य —४ रु.

**कहाणी कुणा मानवाची**
लेखक—सुधा साठे
मूल्य—४ रु.

**व्होरा अँड कंपनी, मुंबई नं. २**

**शैल राधानाथ मोहिनी**
ले. श्रीकांत रॉय
मूल्य— २.५० रु.

**घरदार**
ले. व्यंकटेश माडगुळकर.
मूल्य— २-०० रु.

**छोटा जवान**
ले व्यंकटेश माडगुळकर
मूल्य— १-५० रु.

●●●

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट







पांढरेशुभ्र डेटच तुमचे कपडे स्वच्छ नि पांढरेलखलखीत करू शकेल. डेटने तुमचे रंगीत कपडेही कांहीही अपाय न होता स्वच्छ निघूं शकतात. ही किमया आधुनिक डेटच सहजपणें करू जाणे! अन् तोहि कपड्यांच्या तंतूंना एवढासासुद्धां अपाय न करता.

स्वस्तिक ऑईल मिल्स लि. मुंबई.

Shilpi-SOM-28-MAR








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

